राजाराम महाराजांच्या रोमहर्षक जीवनावर आधारलेले

# " चेतावणी "

तीन अंकी नाटक



लेखक

द. रा. कानडे



महाराष्ट्र कला निकेतन, हैदराबाद.

**प्रकाशक :**
साहित्य चिटणीस
विकास प्रकाशन.
कार्यालय–
महाराष्ट्र कला निकेतन मंडळ,
जामबाग, हैदराबाद



**मूल्य :**
दोन रुपये फक्त.



**प्रथमावृत्ति :**
चैत्र शुद्ध १ शके १८८०.



**चित्रकार :**
सुरेश गंगाखेडकर.



**मुद्रक :**
लोकविजय मुद्रणालय,
गौळीगुडा, हैदराबाद

# अर्पण-पत्रिका

तीर्थरूप कै. सौ. लक्ष्मीबाई कानिटकर

आई ! तुला काय देऊं ! कांहींहि व व कितीहि दिलं तरी तुझ्या ऋणांतून मी मुक्त थोडाच होणार आहे, म्हणून फेडीच्या भरोस न पडतां त्या ऋणाच्या व्याजाच्या फेडीतच आमरण राहूं इच्छिणारा............

तुझा लाडका

दत्तू

॥ श्री ॥

# निवेदन

॥ माता तशी स्वभाषा सेवाया होय आपणा उचित ॥
॥ किंबहुना मातेहून अधिक तिची योग्यता असे खचित ॥
॥ जरि जन्म देई माता भाषा व्यवहार शीकवी सकळ ॥
॥ माते शिवाय जन्महि जाय न भाषेशिवाय एक पळ ॥

मातृभाषा–कै. कृष्णशास्त्री चिपळुणकर

अशा श्रेष्ठ मायभाषेची सेवा करण्याची ईर्षा होती व आहेहि. लेखक भाषाविशारद किंवा पदवीधर नसूनहि वरील ईर्षा बाळगीत आहे हे धाडसच होय. आईला बोलका व सुविद्य मुलगा जितका प्रिय तितकाच तिचा मुका व अंध मुलगाहि तिला प्रिय असतो.

रुक्ष आणि कंटाळवाणा समजला जाणारा इतिहास, हा लेखकाच्या करमणुकीचा विषय. त्यांतल्या त्यांत मराठ्यांच्या इतिहासाकडे त्याची धाव जास्त.

लेखकाचे पूर्वज मराठ्यांच्या साम्राज्यांत एक सुप्रसिद्ध सेनापति होऊन गेले. त्यांचा इतिहास व त्यांच्या वंशजांचा वृत्तांत लिहिण्याचा लेखकाचा संकल्प आहे. या संकल्पाच्या ध्येयपूर्ति-

गोडी लागली आणि त्या गोडींतूनच या ' चेतावणी ' नाटकाच्या कथानकाची कल्पना निर्माण झाली.

श्रीमंत छत्रपती शिवप्रभूंच्या जीवनावर नाट्यरुपानें प्रकाश पाडण्याचें कार्य अनेकांनी केले. नंतर श्रीमंत छत्रपती संभाजी महाराजांच्या कालावर नाट्य वाङ्मय निर्माण झाले. त्यापैकी ' सभाजीचा वध ', ' रायगडची राणी ', ' बेबंदशाही ' आणि ' राजसंन्यास ' ही नाटकें वाचण्याचा व पहाण्याचा योग आला; परंतु श्रीमंत छत्रपती राजाराम महाराजांच्या जीवनावर प्रकाश पाडणारी कथानकें फार थोडी अस्तित्वांत आहेत. पैकीं लेखकाच्या वाचनांत श्री. रा. रा. गुप्ते यांनी प्रकाशित केलेलें ' रक्तांगण ' हे एकच नाटक आले, प्रयोग पाहण्याचा मात्र योग आला नाहीं.

श्री शिवप्रभूंनी मोठ्या दीर्घ प्रयासानें महाराष्ट्राच्या मानेवरील परकीय सत्तेची धूरा झुगारून दिली. ती श्रीमंत छत्रपती संभाजी महाराजांच्या वधानंतर पुन्हा मानेवर बसण्याची चिन्हे दिसूं लागली आणि स्वतंत्र मराठी साम्राज्य धुळीला मिळण्याचा प्रसंग प्राप्त झाला. अशा कठीण प्रसंगी छत्रपती राजाराम महाराजांनी ती मराठी साम्राज्याची विस्कटलेली घडी सावरून महाराष्ट्राचे स्वातंत्र्य व मराठी साम्राज्याची पुनर्रचना करण्याचा दीर्घ प्रयत्न करून यश संपादन केले.

श्रीमंत छत्रपती संभाजी महाराजांचा परकीय सत्ताधीशांनी अमानुषपणें वध करून हिंदवी साम्राज्य व हिंदू पदपादशाही नेस्तनाबूत करण्याचा डाव सिद्ध करून श्रीमंत छत्रपती संभाजी महाराजांच्या बेछूट राजवटीनें त्रस्त होऊन श्रीमंत छत्रपती संभाजी महाराजांचे शत्रू बनलेल्या स्वकीयांचीं मनोभूमी पुन्हा स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यास तयार केली आणि सभाजी महाराजांच्या अमानुषपणें झालेल्या वधाला प्राधान्य देऊन मराठ्यांच्या मनाला चेतावणी दिली. विस्कळीत मराठी साम्राज्याची घडी बसविण्या-

करितां त्याच त्रस्त मराठ्यांचे साहाय्य मिळविले आणि हिंदुपदशाही तारली. हाच या 'चेतावणी' कथानकाचा वर्ण्य विषय आहे. या पहिल्या प्रयत्नाला श्री. रा. रा. आबासाहेब चांदोरकर यांनी अभिप्राय देऊन प्रोत्साहनात्मक आशीर्वाद दिला आणि हा कथाभाग मुद्रित करण्यास चेतावणी दिली आणि म्हणूनच त्यांच्या आज्ञेनुसार हे धाडस केले आहे.

नाट्यकलेच्या जोडीला साहित्य क्षेत्रांतहि भर घालण्याच्या दृष्टीनें महाविद्यालयीन विद्यार्थ्यांनी स्थापन केलेल्या महाराष्ट्र कला निकेतन मंडळानें प्रकाशन शाखाहि प्रस्थापित केली आहे. लेखकाचे नाटक त्यानी प्रकाशांत आणण्याची तयारी दर्शविली याबद्दल लेखक त्याचा ऋणी आहे तसेच मुद्रिते तपासून आणि वेळोवेळीं योग्य त्या मौलिक सूचना दिल्याबद्दल श्री. व्यं. द. टिळक एम्. ए. बी. एड्. यांचा लेखक अत्यंत ऋणी आहे.

पहिलाच प्रयत्न असल्यामुळें काहीं चुका आढळल्यास वाचक क्षमा करतील अशी आशा बाळगतो.

शेवटी मुद्रणालयाच्या मालकांचे व त्यांच्या सहकाऱ्यांचे मनःपूर्वक आभार मानून रजा घेतो.

वर्षप्रतिपदा शके १८८०<br>
दि. २१ मार्च १९५८<br>
५–२–२१८, जामबाग,<br>
हैदराबाद (आं. प्र.)

जनता जनार्दनाचा कृपाभिलाषी<br>
**दत्तात्रय रामचंद्र कानडे**

नाटककार हे कै. गडकऱ्यांच्या पंथाचे असल्यानें व गडकऱ्यांनी रचलेल्या 'राजसंन्यास' या नाटकाचाच पुढील प्रसंग त्यांनी या नाटकांस निवडला असल्यानें गडकऱ्यांच्या भाषेची शैली या नाटकांत दिसून आल्यास आश्चर्य नाहीं.

मला नाटकाची विशेष गोडी नाहीं असे असूनहि या नाटकाची हस्तलिखित प्रत वाचून मला आश्चर्यानंद झाला. प्रत वाचण्यास आरंभ केल्यापासून ती संपेपर्यंत खाली ठेवली नाहीं.

श्री. अण्णासाहेबांचा हा पहिलाच प्रयत्न असून तो श्रीसमर्थांच्या म्हणण्याप्रमाणें 'नेटका' झाला आहे असें मला वाटते. नाटककारांना माझी अशी प्रेमाची सूचना आहे की त्यांनी या नाटकानंतर विराम न घेतां अशीच शिवशाहीतील ऐतिहासिक प्रसंगावर आणखी नाटकें लिहून श्रीराम–रामदास श्री शिवराय यांच्या आनंदवनभुवनांत 'रामराज्याचा' नंदादीप प्रज्वलित करून महाराष्ट्राला आपल्या मूळ स्वरूपाचे दर्शन घडवावें.

श्रीदेवबंध विमोचक, राक्षसकुल निर्दालक श्रीरामराय यांनी त्यांना या कार्यासाठीं दीर्घायुष्य द्यावे अशी माझी प्रार्थना आहे.

| | |
|---|---|
| भागानगर,<br>अनंतचतुर्दशी शके १८७९<br>दि. ७ सप्टेंबर १९५७. | श्रीरामचरणरज<br>(सही) **आबा चांदोरकर** |

अशीच एक ऐतिहासिक सत्यकथा निवडून तिचेवर माझे मित्र श्री. दत्तात्रय रामचंद्र उर्फ अण्णासाहेब कानडे यांनी हें नाटक रचून प्रसृत केले आहे. ते वाचून व पाहून सर्व शिवभक्तांस, अखिल मऱ्हाठ्यास आनंदच होईल. नाटकाचा प्रसंग उदात्त असून पात्रांची भाषा त्या उदात्ततेस साजेशीच आहे. त्यांच्यांत स्वराज्यासाठी स्वार्थत्याग करण्याची अहमहमिका लागलेली दिसत आहे. श्री दासबोधातील तत्त्वांची छाया नाटकांत पसरलीं असल्याचें जाणत्यांचे दृष्टीस पडेल. तत्कालीन वर्तन, बोली, श्रद्धा, रीतरिवाज, भाषणें, शब्दांची ठेवण याची या नाटकांत खुबीदार पखरण केली आहे.

श्री समर्थांनी सत्त्वगुणाचे वर्णन करतांना अनेक प्रकारचा उद्धार केला आहे. त्यांत ' देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगाशी तुटी ।। प्राण अर्पावा शेवटी । तो सत्वगुण ।। असे एक महावाक्य आहे. त्यांच्या काव्यांत देव, देश याची एकरूपता झालेली दिसते हे विवेकी व सत्त्वगुणाढ्य भाग्यवताच्याच दृष्टीला दृगोचर होणार करंट्याच्या नाहीं. श्री दासबोधादि त्यांच्या प्रत्ययाच्या सर्व काव्यांत जेथें जेथें ' देव ' शद्ब येतो तेथे तेथें त्या शद्बातील 'व' हे अक्षर काढून त्याचे जागीं ' श ' हे अक्षर घातल्यास तेथील बाकीच्या सर्व वर्णनाचा जोड–सांधा बेमालूम कसा बसतो हें विचारवंत सात्त्विक माणसास सांगणें नलगे

या नाटकाचा वर्ण्य विषय देश (व) सेवा हा आहे. म्हणजे श्रीच्या आज्ञेनुसार तो सत्त्वगुण प्रधान आहे आणि सत्त्वगुणच देवास आवडतो म्हणून या नाटकांस मी सात्विक नाटक म्हणतो व 'सत्त्व परीक्षा' नाटकाच्या वर्गात या ' सत्त्व परीक्षा ' देणाऱ्या नाटकाची गणना करतो.

एवढे मुद्याचे म्हटले तरी पुरे आहे मग या नाटकांत रसपरिपोष उत्तरोत्तर कसा वाढत गेला आहे, भाषा कशी साजेशी झाली आहे, पात्रांच्या तोंडून एकच एक मुद्याच्या समर्थनाचें वर्णन कसें ऐकावयास मिळते, वर्णन संगती कशी साधली आहे इत्यादि दुय्यम प्रकारचा उलगडा मी येथें करीत नाहीं तो आपोआप प्रेक्षकांच्या दृष्टीपुढें उभा राहील.

भारतांत प्रांतिक भाषेंत प्रथमतः संस्कृत नाटकाची रूपांतरें तसेच त्याच्या आधारें नूतन निर्मित अशी नाटकें निघाली. मराठींतहि ही प्रथा रूढ झाली. माझ्या स्मरणाप्रमाणें मराठीतील सर्वांत जुने तंजावरच्या सरस्वती महालांत सांपडलेलें व छापलेलें 'लक्ष्मीकल्याण' हे नाटक होय. कल्याण म्हणजे लग्न. महाराष्ट्रीय संतमंडळीनें वाङमयाचे या भागाकडे दुर्लक्ष केले. अलिकडच्या काळांतील मराठी नाटकाचें आद्य लेखक श्री. विष्णुदास भावे होत.

प्रथम पौराणिक व संत चरित्रावर नाटकें (मराठींत) निर्माण झाली. ती बहुतेक संगीत आहेत. त्यानंतर ऐतिहासिक नाटके पुढे आली. ती बहुतेक गद्य आहेत.

ऐतिहासिक नाटकांत संगीतापेक्षां गद्याचा जामानिमा अधिक शोभून दिसतो हें खरे आहें वीरश्रीच्या भाषणांत संगीत पदे घातल्यास फारसे शोभून दिसणार नाहीं. पण हा मतांतराचा प्रश्न आहे.

मराठीतील ऐतिहासिक नाटकें बरीचशीं मराठी साम्राज्यातील प्रसिद्ध व्यक्तिवर रचली गेली. श्री शिवाजी महाराजांवर अशी कांहीं नाटकें निर्माण झाली. त्यांनी जे स्वराज्य स्थापिले त्यांस त्यांनी स्वतच " महाराष्ट्र राज्य, देवा ब्राह्मणाचे राज्य, हिंदवी राज्य स्वराज्य " अशीं नावे दिली आहेत. देव म्हणजे गीतेनें सांगितलेल्या दैवीसंपत्तिनें युक्त असे लोक व समाज, आणि ब्राह्मण म्हणजे सर्वच ब्रह्मदृष्टीनें पाहणारे महात्मे. या महात्म्यांची दृष्टी जात, धर्म, पंथ, पक्ष यांचें पलीकडे गेलेली असते. ' सर्व सुखी असावे ऐसी वासना ॥" धरून त्याप्रमाणें वर्तन करतात. अर्थात या व्याख्येस अनुसरून श्री शिवराय आणि त्याची शिवशाही वागत होती म्हणून महाराजांवर व शिवशाहीतील वीर पुरुषांवर तसेंच शिवशाही टिकविण्यासाठीं प्राणार्पण करणाऱ्या हुतात्म्यावर मराठी नाटककारांनी नाटके लिहिणें हें यथायोग्यच होय !

# प्रस्तावना

संसाराचें आत्मकालीन दृष्यचित्र म्हणजे नाटक. संसारी मनुष्य बहुधा सत्त्व रज तम या त्रिगुणांनी लिप्त असल्यानें त्याच्या नाटकांतील या चित्राचेहि स्वरूप त्रिगुणबद्ध असणें साहजिकच आहे.

जगांत तमोगुणाचें थैमान फार, सत्वगुण अत्यंत दुर्मिळ म्हणून "सत्वपरिक्षा" सारखीं नाटकेंही फार थोडीं निपजतात. त्याच्या खालोखाल रजोगुणी माणसे व त्यांचे जीवन व्यवहार आणि त्यावर आधारलेली नाटकें. युरोप आणि अमेरिकादि पाश्चात्य देश आद्भिौतिक संस्कृतीनें मदांध झालेले, त्यामुळें त्यांच्या वाङमयांत तामसीवृत्तीचें थैमान फार, अर्थात त्यांच्या नाटकांत या गुणांचेच तांडवनृत्य असल्यास आश्चर्य नाहीं. भारतीय संस्कृति अध्यात्मिक बैठकीवर ठामपणें उभारलेली असल्यानें तिच्या अंग प्रत्यंगांत सात्विक गुणाचे शुभ-मंगलमय दर्शन होणें साहजिकच. आमच्या प्राचीन व अर्वाचीन नाटकांत दुर्गुण सोडून माणसानें सद्गुणाची कांस धरावी असा सदुपदेश बहुधा केलेला असतो.

जगांतील सर्व सांस्कृतिक कलांचे उगमस्थान हा आमचा भारत देश होय, हें इतिहासानें सिद्ध केले आहे. इतर कला व वाङमय याप्रमाणें नाट्यकलेचेहि उगमस्थान भारतच होय. नाट्यशास्त्राचे व्यास भरतमुनीं याच भारत देशांत जन्मले. त्यांनींच भारतीय नाट्यकलेला संस्कृतीचें लेणें लेवविले. त्यांच्या नियमानुसार अनेक संस्कृत व प्राकृत नाटकें व नाटिका निर्माण करून भारतीय नाटककारांनी आपली नांवे भारतांत व भारतबाह्य प्रदेशांत अजरामर करून ठेविली आहेत !

ॐ

# चेतावणी

## अंक पहिला

### प्रवेश १ ला

( काळ शके १६१० फाल्गुन. स्थळ–रायगडच्या किल्ल्यावरील राजवाड्यांतील भवानीचें मंदीर. अम्बाबाईचे अर्चन चालूं आहे. मुख्य पडद्यामागे आरती चालूं; ती संपल्यावर पडदा वर जातांच रायाजी येसूबाईसह प्रवेश करतो. )

(रायाजी देवीस नमस्कार करतो. येसूबाई देवीस हळदकुंकु वाहून स्वतःच्या कपाळीं कुंकु लावतात व देवीस नमस्कार करतात. )

**येसूबाई** – आई अम्बाबाई! आतां विश्वासानं मांडीवर मान ठेविली आहे. तार कीं मार. तुझी लाज तुलाच.

**रायाजी** – (समाधानाचा उसासा टाकून) आतां मुठींत जीव आला. मी माझं कर्तव्य केलं; जबाबदारीतून मोकळा झालो; जिवांत जीव आला; पण मनींचा मोद मावळला. जीव नकोसा झाला. ज्या वेलीला पालवून खुलवण्याकरितां शौर्य गाजवायचें, कीर्ति संपादन करायची, ती माझी शिवगंगा आकाशगंगेला जाऊन मिळाली. माझी विकासज्योत मालवली. उत्साह नाहींसा झाला. भावना मेल्या, नुसतां रायाजी राहिला.

**येसूबाई** – सेनासागर! वेळवखत काय, आणि तुम्ही हें बोलतां काय! तुमच्या शिवांगीनं कीर्तीचा अढळ ध्रुव गाठला, म्हणून कां तुमचा

उत्साह नाहींसा झाला ? सुभेदार मालुसऱ्याच्या ब्रीदाला तुमचें हे निरुत्साही बोल मातीला मिळवतील थोरल्या खाशांची हांक ऐकतांच, सुभेदारांनी उदेभानूच्या कट्यारीशीं निका लावण्याकरितां कोंडाण्याच्या बोहल्यावर उडी घेतली व सतीच्या शीलाचे संरक्षण करून मानाचें शेला पागोटें मिळवलं. त्यावेळीं कोंडाण्याच्या सिंहानें जें केलें तेचं त्याच्या छाव्यानें आजपावेतो आचरलेलं पाहून स्वर्गांत तानाजीबाबा आनंदानें बेहोष झाले असतील, तोंव तुमच्या या आतांच्या निरुत्साही बोलांनीं त्यांच्या आनंदाला विरजण कां लावतां? जगांत मान्यता मिळविण्याकरितां त्यागाचं दान व स्वार्थाचा त्याग करावा लागतो. रायाजी ! मालुसऱ्यांच्या कुळाची लाज घालवूं नका. मालुसऱ्यांचे ते ब्रीद नाहीं.

**रायाजी** – मासाहेब, बाबांच्या पावलावर पाऊल टाकून आजपावेतों जे केलं तेंच पुढें साधेलसं वाटत नाहीं. वेळेचा गुण असतो. महाराष्ट्राच्या मायमाऊलीच्या सत्त्वसंरक्षणाची वेळ होती. मी व चिटणीसाखेरीज आपले असें चिटपाखरूंही तेथें नव्हते; त्यावेळी जर आम्ही कच खाऊन माघार घेतली असती तर हा हा:कार उडाला असता. आज आपल्यासमोर सरक्षणाकरितां दगडोकोटाची छाती पुढें करून रायगड सिद्ध आहे. लोणाला लोण मिळवलं नि मन उदास झालं. चोंहीकडं अंधार, कांहीं दिसत नाहीं, कांहीं सुचत नाहीं. मासाहेब, कीर्तीच व कर्तबगारीचं कौतुक करणारी गुणवंती गेली. निराशेने गात्रं गळाली, त्राण उरलें नाहीं. ते चिटणीस आले. ( चिटणीस प्रवेश करून देवीस नमस्कार करतो व येसूबाईस मुजरा करतो ) चिटणीस, बालराजे कुठें आहेत?

**चिटणीस**—प्रवासाच्या दगदगीनं बालराजांना झोंप अनावर झाली म्हणून त्यांना महालांत झोंपवूनच इकडे आलों. मायमाउलीच्या मायेचा निवारा नाहींसा झाला होता. आईअम्बाबाईच्या कृपेन मोठ्या झंजावातांतून तो रायगडाचा नन्दादीप मायेच्या पदराआड निरत्तला, संभाळा आतां त्यांना. माउली! सेवेचें सार्थक झालं तो मराठेशाहीचा मुगुटमणी, भोसले कुळाचें मोत्याचें माणिक, रायगडच्या कोंदणांत जडवण्याकरतां तळ कोकणांतून धांवपळीने घाटमाथा गांठतांना, जीवाची जाणीव नव्हती, जगाची ओळख नव्हती आणि भोंवती पाहण्याचीहि हिंमत नव्हती. आज देव देव्हारी स्थापन केल्यावर, जगाची जाणीव झाली, आशेला पालवी फुटली. मनीचा मोद मोहरला व पुढील कार्याकरता जीव आतुरला. सेनासागर, तुम्ही सुद्धा मासाहेबांसह नुकतेच आलेले दिसतां. या वेळीं सुभेदार मालुमन्यांचा आनंद स्वर्गात मावेनासा झाला असेल.

**येसूबाई** – चिटणीस, तुम्ही तुमचा जीव जागीं जडवलांत, पण माझा जीव मात्र मला हरवला. स्वारींला भेटण्याच्या आशेने हुरळून रायगड सोडला, भेट तर झालींच नाहीं पण संसाराच्या सारा-पटांतील एक मोहरा इरेला लावूनहि शेवटीं मात पदरीं बांधून पळ काढावा लागला. मोऱ्यांनीं मात केली तेव्हां रायगडच्या राणीला वाचवण्याकरितां सुभेदाराच्या छाव्यानें, स्वत:च्या जिवाची राणी पणाला लावली एका भोळ्या पोरीला स्वर्गीय सुखाची स्वप्नें दाखवून औटघटकेची राणी होण्यास उत्तेजित केली आणि महाराणीच्या पायातील सोन्याच्या सांखळ्या, हट्टानें मागून घेण्यास तिला उतावळी बनवून, आम्हाला फसवून वचनांत बांधून घेतलं व शिवांगीला सजवून औटघटकेची महाराणी बनवून मोऱ्यांच्या डोळ्यांत धूळ फेकलीं आणि रायगडाची

लाज राखली. स्वतःच्या हातानें, प्रेमाची होळी पेटवून आतां त्या चितेंत उडी घेण्याचा रायाजी अट्टाहास करीत आहेत.

**चिटणीस** –सेनासागर, मासाहेबांच्या बोलण्याचा अर्थ समजला नाहीं. काय म्हणतात मासाहेब ?

**येसूबाई** – सेनासागर दिलगीर आहेत. त्यांना छेडूं नका.

**चिटणीस**– दिलगीर, सेनासागराला त्या शद्वाची कल्पना स्वप्नांतसुद्धां संभवत नाहीं. मासाहेब, आपल्या समजुतीचा घोटाळा झालेला दिसतो.

**रायाजी** – नाहीं. चिटणीस, आतां माझ्या हताश मनाची, उत्साहाच्या हिरिरीने सेवा करण्याची संधी गेली. माझें मन वळवण्याचा निष्फळ प्रयत्न करूं नका.

**चिटणीस**–सेनासागर ! • मराठेशाहीच्या सेवेची मुहूर्तमेढ तर आजच आईअम्बाबाईच्या राऊळांत रोवली, तोंच तुम्हीही दिलगिरी कबूल केलीत ?

**रायाजी** – आमच्या कर्तबगारीला जोम देणारी प्रीतीची ज्योत मालवली, तोंच सेनासागराची रसगंगा आटली. सेनासागर हरला.

**चिटणीस**–रायाजी, तुमचें हें रडगाणें कुळाची रया घालवीत आहे. देश-सेवकाला प्रेमाची बंधनं बांधू देतां कामा नयेत. तुमच्या शिवांगीने महाराष्ट्राच्या मायमाउलीचं, शत्रूपासून संरक्षण करण्यांकरतां तुमच्या प्रेमाने वेडावलेला जीव पणाला लावून स्वार्थत्यागाचा धडा शिकवला निदान तिची तरी शेवटची आशा पूर्ण करून तिला मुक्ती द्या.

**रायाजी**– या पुढें माझा कर्मसंन्यास हाच तिच्या मुक्तीचा सोपान.

मासाहेब ! हा घ्या सेनासागराचा शेवटचा मुजरा. ( मुजरा करून निघून जातो. )

**येसूबाई**– चिटणीस ! कां उगाच हा कंठशोष? निरुत्साहामुळें कार्याला कीड लागते, कुडींतून प्राण गेल्यावर कलेवराला भवितव्याची जाणीव नसते. आमचाही जीव उडाला, या जीव उडालेल्या सजीव मुडद्याला त्याचे अस्तित्व पटवतां पटवतां कोण सायास पडतात! कांहीं सुचत नाहीं, कांहीं गमत नाहीं मन रमत नाहीं नुसता जीव मात्र जगत असतो. तिकडे स्वारी तशी जखडलेली आणि आम्ही इकडे अशा अडकलो गेलो. आईअम्बाबाई ही कोंडी केव्हां व कशी फोडील हें तीच जाणे.

**चिटणीस**–भवितव्य स्वयंसिद्ध नसतं, तें बनवावं लागतं. इतिहास नवा बनत नसतो, जुन्याचीच पुनरावृत्ति होत असते. इतिहास मानवाला मनुष्य घडवीत असतां मानवही इतिहास घडवत असतो. मासाहेब, वाईटाचा विचार करू नये, हें खरं पण वाईट परिस्थितीला तोंड देण्याची पात्रता मात्र सोडतां येत नाहीं. मानव मरणाकरतां जन्म घेतो खरा, पण ते टाळण्याकरतां त्याची सारखी धडपड चालू असते व शेवटीं मरणानेच मानवाला मोल येतं. आम्हाला आमच्या शिवरायाचें मरण गाठायचें आहे. माऊली, तूंच जर आज अशीं हताश झालीस तर आम्हीं कुणाच्या तोंडाकडे पाहायचं? आई, तुला तुझ्या मोलाची जाणीव नसली, तरी तुझी उणीव आम्हाला पोरकी बनवील.

**येसूबाई** – दैवानेंच हताश होण्याचा वखत आणला, एका मागून एक आघात कोसळून सर्वस्वाचा नाश होणार हें चित्र डोळ्यासमोर दिसत आहे. मालुसऱ्यासारखें माणिक हातचें हरवलें. असलें

आघात सहन करण्याची हिंमत आतां राहिली नाहीं. भावजी-कडे तरी जाऊन त्यांचा सल्ला घेऊं या.

**चिटणीस**–ठीक आहे. चला. ( जाऊं लागतात तोंच समोरून राजाराम प्रवेश करतात ).

**राजाराम**–( देवीस नमस्कार करून येसूबाईस मुजरा करतात. चिटणीस राजारामास मुजरा करतो) वहिनी, आज आपण अशा उदास कां ?

**चिटणीस**–त्या काय सांगतील महाराज ? आकाशाची कुऱ्हाड कोसळली, तशी त्यांची उदासीनता वाढली. मोंगलांनीं खाशांना गिरफदार केलं. त्यांना अविचारापासून परावृत्त करण्याकरितां आघाडी-वर गेलेल्या मासाहेबांचा मोऱ्यांनी पाठलाग केला. त्या कोंडीतून हिरूबाबा मासाहेबांची सुटका करीत असतां ते प्राणास मुकले. पुन्हा मान्यांनी मासाहेबांना घेरल्यावर राया-जीनें हट्टानें त्याच्या पायांतील सोन्याच्या साखळ्या मागून घेऊन शिवांगीला सजवली आणि मान्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकली व मासाहेबांचे चरणें वारले. शिवांगी मात्र आकाश-गंगेला जाऊन मिळाली. या संकटांच्या उल्कापातानें मासाहेब हादरल्या.

**राजाराम** –(दुःखानें) एकूण दुष्ट स्वप्नें खरीं ठरतात तर. तीं आगाऊ संकटांची तर सूचना देत नसतील ना ? चिटणिसांनी आतां जी हकीकत सांगितली अगदीं अक्षरशः तेच आम्ही आज स्वप्नांत पाहिलं, म्हणून आई अम्बाबाईचा कौल घेण्याकरितां येथे आलों तों हा असा कौल मिळाला, आई, तूंच जर आमच्याशी कठोर झालीस तर आम्हीहि पण तुझ्याशीं तितकेच कठोर

होणार. बस. आतां एकच विचार. महाराष्ट्राचं गिळलेलं माणिक–आमचे दादा–मोगलांच्या दाढेंतून ज्या दिवशीं ओढून आणूं त्याच दिवशीं तुझ्या दर्शनाकरितां राजारामाचे रायगडीं पाय लागतील. नाहीं परता रायगड अंतरला.

**येसूबाई** – भावजी –

**राजाराम**–वहिनी, यावेळीं आम्हाला आमच्या प्रतिज्ञेपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करूं नका. आजपावेतों आपला शब्द डावलला नाहीं. ती मर्यादा ओलांडण्याचा प्रसंग आणूं नका.

**चिटणीस**–राजे, विकारांच्या आहारी जाऊन असा अविचार करूं नका. इरेला पडून रया घालवूं नका. खाशांनी आघाडीवर जाण्याचा हा वखत नाहीं. संताजी, धनाजी सारखे धीरगंभीर सेनानी पाठिशीं असतां, आपण गड सोडूं नये. देव्हाऱ्यांतील देव स्वयंप्रकाशित नसतो. त्याची प्रभावळ देवाला देवकळा आणते. भक्तामुळेंच देवाला देवकळा प्राप्त होते. आम्ही आपल्याला असा अविचार करूं देणार नाहीं.

**राजाराम**–चिटणीस, ते विखुरलेले वीर येईपावेतों खाशांची काय गत होईल, याचा नको कां कांहीं विचार ? क्षणाक्षणानें खाशांच्या प्राणाचा धोका वाढत आहे. आम्हाला आमची प्रतिज्ञा मागे घेण्यास सल्ला देणाऱ्या तुमची आम्हांला कींव येते. भवानीच्या समोर केलेली प्रतिज्ञा, मानी मराठा मेला तरी मागे घणार नाहीं. वहिनी–नव्हे, आई–पोटी जरी जन्म दिला नाहींस तरी मायेच्या पदराआड वाढवलंस. संरक्षण केलंस, ती माऊली आज आमचा हिरमोड करणार नाहीं.

**येसूबाई** –भावजी, प्रतिज्ञा करण्यापूर्वी परिस्थितीचा विचार करावा लागतो. तुम्ही आज आघाडीवर निघून गेला तर गडाचे संर-

क्षण कोण करणार ? आपल्याला आज कुमक येईपावेतों प्राप्त प्रसंगाला धीरानें तोंड हें दिलंच पाहिजे. उतावळेपणानें संकटं नाहीशी होत नाहींत दुणावतात मात्र. शिवाय आघाडीवर जाण्याकरितां आज आपल्याजवळ पुरेसं माणूसबळमुद्धा नाही व अडकाही नाही. नसत्या हिंमतीच्या जोमानें आपल्याला आज आक्रमण करायचं आहे, प्रतिकार नव्हे. कोल्ह्याच्या शिकारीला जातांना वाघाच्या शिकारीचीं साधनं सामग्री जवळ ठेवावी लागते आणि आज आपण त्याच दृष्टीने तर पंगू आहोत.

**राजाराम**–पण वहिनी – –

**येसूबाई** –भावजी, मला तुमच्या तळमळीची जाणीव आहे. पण नुसत्या तळमळीनें कार्य करतां आली असती तर आम्ही तरी आघाडी-वरून हात हलवीत परत कां आलो असतो. चिटणीस, संताजी, धनाजी वगैरे कारभारी मंडळींना तांतडीनें बोलावून घ्या. (विचार करून) पण गडावर आज हेर देखील नाहींत.

**चिटणीस**–त्याची काळजी नको. आम्ही स्वतः ती कामगिरी बजावून तांत-डीनें परत येतो.

**राजाराम**–चिटणीस, हेरगिरी वाटते तितकी सोपी नसते. हेर चिटणीस नसतों कीं आघाडीवरील सैन्याला आक्रमक अगर प्रतिकारक हालचाली करण्यास आज्ञा करणारा सेनापती नसतो. जिवावर पाणी सोडून त्याला आगींत उडी घ्यावी लागते.

**चिटणीस**–धनी नुसत्या चिटणविसीनें देशसेवा होत नसते. देशसेवकाला हरहुन्नर अंगी मुरवावे लागतात.

**राजाराम**–पण एकाला दुसऱ्याची जोड असली तर कार्य तितकें सुलभ नाहीं कां होणार ?

**येसूबाई** – (आश्चर्यचकित होऊन) म्हणजे भावजी तुम्ही चिटणीसाबरोबर हेरगिरीवर जाणार ? तुमच्या तोलाच तें काम नाही.

**राजाराम** –हा आपला गैरसमज आहे राजाला स्वतःच्या रयतेत मिसळून जनमनाचा कौल घेण्याच हेंच एक प्रभावी साधन आहे. अनादि कालापासून असली हेरगिरी राजेरजवाड्याच्या अंगी मुरलेली असते. प्रभू रामचंद्र सुद्धां रात्री अपरात्री निरनिराळ्या वेषानें अयोध्येत फिरत असत वहिनी, आपला आमचेवर विवास आहे ना ?

**येसूबाई** –(कष्टी होऊन) भावजी, तुम्हांला ही कल्पना तरी कशी शिवली. कोणत्या दिव्यानें आम्ही आमचे हृदय मोकळं करून दाखवलं तर तुमची खात्री पटेल. तुमची वहिनी इतक्या क्षुद्र भावनेची नाहीं हो.

**राजाराम**–(ओशाळेपणानें) क्षमा करा वहिनी. असा भलताच गैरसमज करून घेऊं नका आमच्याविषयीं.

**येसूबाई** – (राजाराम पायावर डोकें ठेवीत असतां त्याला उठवीत) हें काय भावजी ? चिटणीसाबरोबर आज तुम्ही हेरगिरीवर गेला तर आम्ही सारीच एकाकी होतो म्हणून –

**राजाराम**–जशी आपली आज्ञा. चिटणीस आतां विलंब नको. (चिटणीस जातो.) वहिनी, आम्हांला बालराजांना भेटून बराच विलंब झाला. चला आम्हीही आपलेबरोबर तिकडेच येतो. राज-दर्शन तरी होईल. (जातात. पडदा पडतो).

प्रवेश पहिला समाप्त.

---

*

## प्रवेश २ रा

( रायगडावरील किल्लेदाराच्या घराचा सोपा. सूर्याजी पिसाळ व यमाजी कदम बसले आहेत व सारजा देवदासी गात नाचत असतां पडदा वर जातो. )

मी नार नवतिची कवळी भाबडी भोळी ॥
मज छेडु नको वनमाळी ॥ धृ ।
घट घेवुनि यमुना तटी मी जात असे एकटी
नच आडवि मजला वाटी ही नार वृत्तिची गवळी ॥धृ॥ १
गोरसा घटा घेवुनी पति माझा येईल भुवनी
जाऊ दे राधिका रमणा अशि खेळु नकोरे होळी ॥धृ॥ २

**यमाजी—** आनंदाने) वाहवा, बहार केली. ओर एक होने दो. कां किल्लेदार साहे ?

**सूर्याजी—** नको बुवा कंटाळा आला आतां.

**यमाजी—** कां ? बायकोची भितीतर नाहींना वाटत ? नाहींतरी तिची आतांशा आपल्यावर फारच करडी नजर आहे. थांबा, या भितीला मारण्याकरतां मी एक उपाय सुचवतो. ये रूखे सूखे मामले मे तो मजा नही. नाजणी, लाव, ( सारजा दोन प्याले भरून दोघांना देते) भावजी तुमच्या बायकोचा नादानपणा घालविण्यास निशापाणी हाच एक उत्तम उपाय.

**सूर्याजी —** मी बायकोला भितो असं समजूं नका. पण —–

**यमाजी —** पण माहीं अन् परन्तु नाहीं. अरे यार दुनिया दुरंगो है. जगांत कुणी कुणाला चांगलं म्हणलं आहे कां कधीं ? तोंडावर स्तुतीपाठाचें वर्षाव करणारें, तोंड फिरतांच शिव्याचाही वर्षाव करतात. जग आहे. आपणही सर्वांच ऐकावं व मनाचं करावं. आपला

हा सलोख्याचा एकोपा सर्वांच्याच डोळयांत खुपत आहे. तुमच्या बायकोच्यासुद्धां.

**सूर्याजी** –(आश्चर्यानें) सख्या बहिण-भावंडांत एवढा परकेपणा म्हणजे नवलच नाहीं कां ? तुमचा कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतो.

**यमाजी** – अहो गैरसमज नव्हे, खात्री झाली आहे. कालच तिनें आम्हाला गडावर येण्याची बंदी केली आहे.

**सूर्याजी** –कोणी ? तुमच्या बहिणीनें ? ती बंदी करणार कोण ?

**यमाजी** –रायगडची किल्लेदारीण. सूर्याजी पिसाळाची बायको.

**सूर्याजी** –तिला बजाऊन सांगा. म्हणावं हा पिसाळ अद्याप पिसा झालेला नाहीं अद्याप चांगला देहभानावर आहे. त्याला त्याचं हित अनहित समजतं ( दोघेंही पितात. सारजा गाते व नाचते)

(दोघे मिळून–वाहवा, वाहवा म्हणतात. परस्परावर गुलाल उधळतात. तोंच कमळा संतापानें प्रवेश करते. )

**कमळा** - बंद करा हे नाच तमाशे. दादा तुला जरी माणुसकीची कांहीं लाज नसली तरी आम्ही अद्याप जगाची लाज सोडली नाहीं. तूं जरी माझा भाऊ असलास तरी शत्रू गोटांतला आहेस तुला इथें वारंवार येण्याचं काय कारण ? (सूर्याजीस) आपल्यास तरी कांहीं काळ काळबेळेची कल्पना आहे कीं नाहीं ? आज गडावर कोण गडबड. चोंहीकडे दुःख व निराशा पसरली आणि आपण या मैफलींत दंग असावं. मनाची नसली तरी जनाची कांहीं चाड आहे कीं नाहीं? (सारजेस) कायगं सटवे. आईअम्बाबाईच्या सेवेकरतां दिलेली वतनं, गडावर असा नंगा नाच घालण्याकरितां नाहींत. देवदासींना हे असलें ढंग शोभत नाहींत.

**सारजा** – जी बाईसाहेब माझा नाइलाज झाला. किल्लेदाराचं निकडीचं बोलावणं मला नाकारतां आलं नाहीं. आमच्या वतनवाडयाचं भलं बुरं करणं त्यांच्या हाती आहे, म्हणून आम्हाला त्यांची मर्जी सांभाळावी लागते.

**कमळा** – (संतापाने) चल, हो चालती येथून.

**सारजा** – (स्वगत) हें मेले दोघेही नशेंत चूर आहेत. बाईसाहेबांची कांहीं धडगत नाहीं. येथें जवळच कुठेतरी आडोशाला दडून काय होतं ते पहावं. (जाते).

**सूर्याजी** – कां उगाच ही वायफळ बडबड ? त्या बिचाऱ्या सारजेनें काय केलें ? कां उगाच तिच्यावर आग पाखडलीत ?

**कमळा** – वायफळ बडबड ? गडावर काय गडबड आहे याची गडकऱ्याला आहे कां कांहीं खबर ?

**सूर्याजी** – गडावर गडबड, कडाबिडातर कोसळला नाहींना एखादा ? रंजीस जिवाला कांहीं विसावा नको कीं काय ?

**कमळा** – विसावा. रायगडच्या किल्लेदाराला विसाव्याचें वावडे असते. रायगडावर दरोडा पडला नोडच्यांनीं नरडीला नख देण्याचा वख्त आणला. महाराष्ट्राचे मोहरे इरेला पडले आणि अशावेळीं आपल्याला हे नाच तमाशे सुचले. जीव रंजिस व्हायला तरी काय झालं हो ? कुठें गेला होता तलवार गाजवायला ? तरी बरं किल्ल्याच्या खालीं सुद्धां जाण्याचा प्रसंग येत नाहीं आताशा आठ दिवसांपासून पाहते दादाशीं कसली हो खलबत चाललेली असतात ? मासाहेब आघाडीवर गेल्या, आल्या. त्यांच्याकडे जाऊन क्षेमसमाचार तरी विचारलांत कां कधीं ? कबजीकडची तिन्हीं त्रिकाळची हजरी मात्र चुकली नाहीं कधीं. तुळशीसारख्या बटकुरीनं हवं तसं वाकवलं तरी आपला जीव कधीं रंजिस

होत नाहीं ? व आज प्रसंग आल्यावर मात्र आपला जीव रंजिस येतो? धन्याला धत्तोरा अन चोरला मलीदा. वारे वा. किल्लेदाराचा इन्साफ.

**यमाजी** – भावजी ऐका, एका ही तुमच्या बायकोच्या तोंडची मुक्ताफळं. बायकोचा एवढा तोरा माझ्यासारखा नवरा कधीं सहन करणार नाहीं. बायकांनीं आपली पायरी ओळखून वागावं. पाईची वहाण डोईवर वागविण्याचा वेडेपणा कुणाही पुरुषानें कधीं करूं नये.

**कमळा** – बायकोला पाईची वहाण समजून नर्तकींना डोक्यावर नाचणाऱ्या नादाना, तूं भाऊ आहेस कीं आहेस तरी कोण ? बहिणीच्या कुंकवाला काळीमा लागेल अशा छंदांत मेहुण्याला गोंवून बहिणीच्या वर्तनावर शितोडे उडवणाऱ्या अधमा, आतांचे आतां चालता हो माझ्या घरांतून.

**यमाजी** – ( मोठ्यानें हांसून ) कुणाचं घर, कुणाचं दार, म्हणे माझ्या घरांतून चालता हो. मला घरांतून घालवून देणारी तूं कोण ? भावजी मला हा असला अपमान सहन होणार नाहीं.

**कमळा** – अपमान सहन होत नाहीं त्यानं अंगांतुको करूं नये कुणी बोलावलं होतं तुला? माझं घरदार काढणारा तूं तरी कोण रे? हे पाय जिथें असतील तेंच माझे घर, माझे दार. या परता मला दुसरें घर नाहीं कींगण नाही की गोत नाहीं.

**सूर्याजी** – खामोश, आम्ही आमच्या मेहुण्याला शिमग्याचं आमंत्रण देवून बोलावलं आहे. ते आमचें पाहुणे आहेत. गृहस्थाचें घरांत पाहुण्यांचा असा होत असलेला अपमान आम्हला सहन होणार नाहीं. यमाजी काय खोटें म्हणाले. तुझा नवरा निव्वळ कंगाल आहे. ना घर ना दार, ना वतन ना वाडो आणि तेच मिळवण्याकरितां आमची ही धडपड.

**कमळा** – कंगाल रायगडच्या किल्लेदाराला कोण कंगाल म्हणेल ! महा-राष्ट्राच्या भाग्याचा जामदारखाना ज्याच्या स्वाधीन, तो खजांची कंगाल !

**सूर्याजी** – कोळशाच्या दलालींत हात काळें. ज्याचा कधीं उपयोग नाहीं, उपभोग नाहीं अमल जामदारखाना हातीं असला काय अन् नसला काय सारखाच. आजपर्यंत स्वराज्याची सेवा केली काय फळ मिळालं ?

**कमळा** – काय मिळालं नाहीं ? बारागिराचा शिलेदार, शिलेदाराचा पालेगार आणि पालेगाराचा किल्लेदार. एवढ्या थोड्या अवधींत कोणाच्या नशिबीं हा उत्कर्ष आहे ? मनुष्याला जों जों मिळतं तों तों त्याची हाव वाढते. आतांपावेतों घरदार, वतनवाडीही झाली असती, पण अधिकाराच्या उत्कर्षाबरोबर दुर्दैवाने ख्याली-खुशाली वाढली तशी कर्तबगारीलाही चाई लागली. या ख्याली-खुशाली पायीं मोठमोठीं साम्राज्यें धुळीला मिळालीं. निष्ठावंत मराठ्याला हें असले नादान बोल शोभत नाहींत. स्वराज्य–सेवकाच एकच ध्येय, एकच आशा, स्वराज्यवृद्धी.

**यमाजी** – स्वराज्य, ध्येय-निष्ठा, असल्या साखरपेरी गोडाव्याने हुरळून जाणारे सूर्याजी पिसाळ तरी खास नाहींत.

**सूर्याजी** – निःसंशय नाहीं जियें मिळकतीला वाव नाहीं तिथें निष्ठेला ठाव नाहीं हा रायगडचा जामदारखाना सांभाळता सांभाळता प्राणावर बेतण्याचा प्रसंग आहे. आम्हाला परिस्थितीची खडान-खडा जाणीव आहे. आम्ही गाफील नाहीं. असली जीव घेवू निष्ठा आम्हाला मान्य नाहीं. शिरसलामत तो पगडी पचास.

**यमाजी** – या निष्ठेपायीं धूळधाण होण्यापेक्षां बाईच्या देशमुखीचें वैभव किती शोभून दिसेल ? ही कमळी उद्या देशमुखीण झाल्यावर

तिचा थाट काय विचारता? सत्तेची वतनवाडी, मत्तेचे घरदार, दास दासी, आम्ही तर नुसत्या कल्पनेनेच दिपून गेलो. त्यावेळी मात्र तुझ्या जिभेवर असलेले निष्ठा, ध्येय, स्वराज्य हे सारे शब्द साफ धुवून निघतील. तेंच देशमुखी मिळविण्याकरिता आम्ही आज आठ दिवसापासून सारखी खलबत करीत होतों. शिर्केराजांचा सांगावा आहे हा. ते मोगलाईंत मोठे मानाचे मानकरी आहेत नवसा-सायासाने जे लाभयचं नाहीं ते आज अनायासे चालून घरीं आलं आहे. हा, रायगड शिर्क्यांच्या स्वाधीन केला कीं, वाईच्या देशमुखीची सनद हातीं आलीच. क्या खूब सवदा नगद है. इस हाथ दे और इस हाथ ले; पण कमळाराणी त्यावेळी मात्र आपल्या या गरीब भावाला स्वतःच्या राजवाड्यांतून अगांतुक म्हणून हाकलून देवू नका बरं.

**कमळा** - चल. दूर हो चांडाळा. (दु:खातिशयानें) हायरे दुर्दैवा. हिरा म्हणून ज्याला आजपावेतों डोक्यावर घेऊन मिरवले तो शेवटीं गारखडाच ठरला. या गारखड्यालाही हिऱ्याचे स्वरूप आणता येईल. गारेतूनच हिरे निपजतात. समाधान, संयम व शौर्य या गुणाचे गारखड्याला पैलू पाडून गारेचा हिरा बनवता येईल. बाजीप्रभू देशपांडे यांनी ध्येयाखातर प्राण पणाला लावले, पण हातांतील पटा सोडला नाहीं. थोरले खाशे सुरक्षित पोंहोचल्याची खात्री होईपावेतों घायाळ अवस्थेंतही शत्रूचा शिरच्छेद करून त्यांची दाणादाण केली. तानाजी मालुसरे स्वामींसेवेपायीं पोटच्या पोराच्या देवकार्यांचे उदक धरणीवर सोडून उदभानूच्या कट्यारीशी लगीन लावून अजरामर झाले. बहिरजी नाईक, बाळाजी चिटणीस, हिरोजी फर्जन्द या सारख्या प्रभावळीकडे तरी पहा. खंडोसारख्या पोराकडून तरी कांहीं धडा घ्या. चिटणीसांचं घराणं ध्येयाकरितां धुळीला मिळालं. थोरल्या खाशांना

तरी काय कमी होत? वडील आदिलशाहीत जवळ जवळ वजिरी पदापावेतों पोहोंचलेलें, पुणे परगण्याची स्वतत्र जहागीर, त्यांनी स्वत:च्या ध्येयाला थोडा जरी धक्का दिला असना तर मोगलाईत ते मिर्झा राजापेक्षाहि मानाचे मानकरी बनले असते. कदाचित वजारीहि मिळवनां आली असती. पण त्या मेलेल्या तूप रोटी पेक्षां त्याना स्वतंत्र महाराष्ट्राची कांदाभाकर मानवली. धनी, प्रत्येक परकीय सत्व स्वत:च्या पादाक्रांत प्रांतांतील प्रजेचा स्वाभिमान नष्ट करण्याकरितां जहागिरी, वतनवाड्या, या सारख्या सोन्यानें मढवलेल्या बेगडी बेड्यांनी जखडून टाकते पण विश्वास मात्र ठेवित नाहीं. मोंगलाईतील प्रत्येक हिंदु-सरदाराबरोबर एकेक मुसलमान सरदार त्यांचा मदतगार असतो, पण तोंच पुढें शिरजोर बनून आपल्याच धन्यावर कुरघोडी करतो. तो वतनवाडीचा फेंकलेला शिळा तुकडा चघळींत असतां त्यांच्या डोळ्यादेखत जेते जित प्रांतांत नंगा नाच घाल-तात. तुमच्यासमोर तुमच्या आईबहिणीवर, लेको सुनांवर होत असलेला अत्याचार, तुम्हाला सहन होईल कां ? याउपरहि तुम्हाला देशमुख चा मोह आवरत नसेल तर --

**सूर्याजी** – तर काय ?

**कमळा** – असल्या मिळमिळीत सौभाग्यापेक्षां मला ढळढळीत **वैधव्य** पत्करलें. आज मी भावाची बहीण नाहीं. कदाचीत उद्या नव-ऱ्याची बायकोही राहणार नाहीं,

**यमाजी** – कमळे तूं गति गृहिणी आहेस. आताच्या या तुझ्या बेछूट वर्तनानें तूं दोन्ही कुळांला कलंक लावीत आहेस ?

**कमळा** – तुझ्यासारख्या निष्ठाहीन नादानांनीं कुलाभिमानाच्या गप्पा मारूं नयेत. नराधमा, उद्या काय व्हायचे ते होण्यापूर्वीच, आम्हा

शिसाळांच्या घराण्याला नरकाचा मार्ग दाखवणाऱ्या तुलाच तेथे पोहोंचता करतें. (कटयार उपसून यमाजीच्या अंगावर धांवून जाते. सूर्याजी तिला अडवतो **व यमाजीच्या मदतीने** तिला पकडतो. )

**सूर्याजी** – पाहतां काय. या बेफाम बायकोला कैद करून अंधारकोठडी दाखवा. आपल्या कार्याची ही अडगळ वेळींच हातावेगळीं केलेली बरी. ( कमळीला घेऊन जातात. कमळेचा शेला पडतो. सारजा पुढे होऊन )

**सारजा** – जन्माने हीन असलेल्यामुळें पोटाची खळगी भरण्याकरितां मी आज पावेतों माझ्या कलेचा दुरूपयोग करून कितीकांना संसारांतून उठवलं असेल, पण पोटाची खळी भरणं हेंच जीविताच ध्येय नसून राष्ट्रसेवा हेंच कलेचं खरं कार्य हा धडा मला आज कमळाबाईंनीं घालून दिला, (सारजा कमळाबाईचा शेला उचलून घेते.) त्या माझ्या गुरुला संकटांतून सोडाविण्याकरितां मलाही बाहेर पडलंच पाहिजे ( जाते. पडदा पडतो. )

प्रवेश दुसरा समाप्त.

---

## प्रवेश ३ रा

(स्थळ : ताराबाईचा महाल. ताराबाई विचार करीत बसली आहे)

**ताराबाई**–(स्वगत) बाळंतिणीच्या पांचवीला सटवी येऊन बाळाच्या भाळीं त्याचे भवितव्य रेखाटते म्हणतात. तिनें तें चांगलं लिहाव म्हणून तिला खूष करण्याकरितां त्या दिवशी तिची पूजा करतात. आमच्या वेळीं त्या पूजेत तर कांहीं अंतर पडले नाहींना ? होय. म्हणूनच आमचे कपाळीं हा असा जन्माचा बंदिवास तिने लिहिला. भाऊबंदकीच्या भावनेनें वेडावून भावजींनी सोयरासासूबाईंचा भिंतीत चिणून वध केला आणि आमच्या कपाळीं हा बंदीवास आला. मामंजींच्या मिराशीचें वास्तविक दोघेही सारखेच हिस्सेदार पण एकाने राज्योपभोग भोगावे तर दुसऱ्यानें बंदिवास. तरीही स्वारीचें बंधुप्रेम अढळच. या अनिष्ठ निष्ठेविरुद्ध स्वारीच्या कानीकपाळीं सारखी ओरडन असते पण –– (चाहूल) अगबाई, स्वारी आली वाटतं. ( राजाराम विचार करीत प्रवेश करतो ) आपल्याच तंद्रीत दिसते स्वारी.

**राजाराम**–(स्वगत) मोगलांनीं दादांना गिरफतार केलं हें ऐकून तळपायाची आग मस्तकाला जाऊन मस्तक सुनं झालं. मोगलांनीं तो दादांचा अपमान केला नसून आम्हां महाराष्ट्रीय मराठ्यांचा तो उपमर्द होय. ही खाजवून काढलेली खरुज आम्हाला सहन होणार नाहीं. दादासाहेब आमचा द्वेष करीत असतील तर करोत पण आम्हाला ते हरघडी वंदनीयच आहेत. मराठ्यांच्या मसनदीचे वास्तविक तेच खरे वारस. आम्हाला ती नको. आम्हाला छत्रपतीच्या सेवेची, स्वतंत्र–मराठी साम्राज्याची

एकनिष्ठ सेवक म्हणून सेवा करण्याची इच्छा होती व आहे ही. आम्ही आज मोकळे असतो तर दादांच्या खांद्याला खांदा देऊन छत्रपतीवरून जीव ओवाळून टाकला असतां. कदाचित हा प्रसंगहि येतांना. आजपावेतों जी संधी आम्हांला मिळाली नाहीं ती आज या दुर्दैवी घटनेंमुळें प्राप्त झाली. वखत बाका आहे खरा. गोवेकर सिद्दी व मोंगलांनीं सारा महाराष्ट्र वेढला आहे. दुही व द्वेषानें मराठेशाही पोखरलेली आणि चोंहीकडे बेबंदशाही माजलेली—

**ताराबाई**–(पुढे होऊन) आणि अशावेळीं आपण भावजींना मोंगलांच्या तांवडीतून सोडवून आणण्याची भवानीच्या पायावर हात ठेवून प्रतिज्ञा केलीत ? आज चोंहीकडे आभाळ फाटले असतां आपण कुठें कुठें म्हणून ठिगळ देणार ? आज कुणाचाच पायपोस कुणाच्या पायांत नाहीं. चोंहीकडे फितुरी पसरलेली, भावजींनीं माजवलेल्या बेबंदशाहींत मातबर कर्ते परागंदा झालेले, कुणाचा तरी आपल्याला आधार आहे कां ? आणि एवढ प्राणावर पाणी सोडून साहसी धाडस तरी कुणाकरतां करायचं स्वतःच्या भावाला वैरी समजणाऱ्या भावाकरतां, भावजीकरतां !

**राजाराम**–होय, त्याच तुमच्या भावजीकरतां. स्वतंत्र मराठी साम्राज्याच्या छत्रपतीकरतां. श्री समर्थांनी दादासाहेबांना केलेला उपदेश त्यांना मानवला नाहीं. वहिनींना मानवला असला तरी पतीला तो पटवता आला नाहीं. जे त्यांना साधलं नाहीं ते आज आम्हाला आचारांत आणलं पाहिजे व तेच आमचं आजचं अंगीकृत कार्य. समर्थांची शिकवण व्यापक आहे. व्यक्तिगत स्वार्थी नाहीं. ऐका ती एकदां तरी. जाऊंद्या कानांवरून तो मंगल संदेश.

"श्रेष्ठी जे मेळविले। त्यासाठीं भांडत बसले।
मग जाणावे फावले गलिमासी।"

आणि शेवटीं दिव्य संदेश देतात तो हा की --

" समय प्रसंग ओळखावा। राग निपटोनी सांडावा।
आला तरी कळो न द्यावा जनामध्ये।"

राणीसाहेब, आज स्वकीयावर सूड उगवण्याच्या अट्टाहासापेक्षां त्यांच्याशीं गोडीगुलाबीनेच मनमेळणी करून केलेल्या एकोप्यातच राष्ट्राचें कल्याण आहे. आज तुमच्या भावजीचें व्यक्तित्व संभाजी भोसले एवढ्यापुरतेच मर्यादित नसून ते स्वतंत्र महाराष्ट्राचे छत्रपति एवढ्या व्यापक व्यक्तित्वावर अधिष्ठित आहेत. त्या साम्राज्यव्यापी छत्रपतीकरतां तरी आपल्याला श्रेष्ठींचा महामंत्र डावलता येणार नाहीं. आम्ही मराठे आहोंत. आम्हाला स्वतंत्र मराठी साम्राज्याचा अभिमान आहे. आम्हाला आज स्वार्थी विचारांना थारा देतां येणार नाहीं.

**ताराबाई**–आणि आम्ही स्वातंत्र्यविरोधी आहोंत अशी कां आपली कल्पना आहे ? आम्हालाही मराठ्यांच्या स्वतंत्र साम्राज्याचा उज्ज्वल अभिमान आहे. त्याच अभिमानाच्या आपुलकीनें सांगते कीं, मोंगलांच्या छावणींतून भावजींना सोडवून आणण्याचा आत्मघातकी प्रयत्न करण्यापूर्वी गडावर स्वतःचे नांवे द्वाही फिरवून राज्यसूत्रें हातीं घ्यावींत. महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याकरतां व स्वसंरक्षणाकरतां देशोधडीला लागलेल्या कर्त्यांशीं हातमेळणी करून त्यांचा विश्वास संपादन करावा.

**राजाराम**–व तोंपावेतों दादासाहेबांच्या जीवाला कांहीं बरेवाईट करण्यास मोंगलांना वाव द्यावा असेच ना? एकोप्याच्या पायावर उभारलेले हें सिंहासन दुहीसारख्या फुटीर वृत्तीनें बाटवण्याचा आपण

आम्हाला सल्ला द्यावा ?

**ताराबाई**-भावजींच्या जीवाला तिकडे बरेवाईट होण्याची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. बादशहाची शहाजादी त्यांच्यावर फिदा आहे असें आम्ही ऐकतो. त्या बादशहाचे मन वळवून, रदबदली करून भावजींना खात्रीनं वाचवतील. पूर्वी, आदिलशहाची शहाजादी बजाजी निंबाळकरावर अशीच फिदा झाली होती. तिनें बापाचें मन वळवून बजाजीला झालेली प्राणदंडाची शिक्षा रद्द केली व त्याला मुसलमान धर्माची दीक्षा देऊन त्याच्याशीं निका केला तोंच प्रसंग या वेळींही होण्याचा संभव आहे.

**राजाराम**-राणीसाहेब, आपल्या या क्षुद्र विचारसरणीची आम्हाला खरोखरच कींव येते. स्वतःचे स्वार्थी मनोरथ पूर्ण होण्याकरतां आपल्यापैकीं एक, स्वकीयांतून उठला तरी त्याची खंत न बाळगता उपेक्षां करावी. हीच कां माणुसकी ? धर्मांतरित स्वकीय किती घातुक असतात याची आपल्याला थोडीतरी कल्पना आहे कां ? अस्सल मुसलमानापेक्षां हे नौमुस्लिमच माणुसकीवर पाणी सोडून कडवे धर्माभिमानी बनतात, हें तत्व जेव्हां मूळ धर्मप्रचाराला पटले तेव्हां त्यांनीं पुरुषापेक्षां स्त्रियांनाच जास्त प्रमाणांत बाटवून मुसलमान बनवलं आणि त्यांचा नौमुस्लिमांशींच शरीरसंबंध जोडण्याचा पायंडा पाडला. एक पत्नित्वाच्या बंधनाला झुगारून एकाऐवजीं चार बायका करण्यास रूढीनें मान्यता दिली. संख्याबलाच्या वाढीचा हा इस्लामी धर्माच्या प्रचारकांचा डाव आमच्या भारतांत कल्पनेबाहेर साधला. आम्हा भारतीय लोकसंख्येंतून जवळ जवळ तिसरा हिस्सा आमच्यातून उठला व उपेक्षित बनला. या उपेक्षितांची मालमत्ता बाकी दोन हिश्शांच्या वाट्याला येईल या क्षुद्र व स्वार्थी विचाराने आम्ही त्यांना

आमच्यांतून दूर केल्यावर त्यांची मालमत्ता आम्हाला मिळाली तर नाहींच उलट तिळाला गूळ बोळवण म्हणून आमच्या वाटयाची-सुद्धां मालमत्ता लुटीच्या रूपाने त्यांच्या हातीं द्यावी लागली. रक्ता-भिसरणाचा एवढा घातुक परिणाम झाला तरी अद्यापहि आमचे डोळे उघडले नाहींत, गुलाबाच्या अस्सल रोपटयापेक्षां त्यावर कलम केलेले रोपटे जोमाने वाढून अल्पावधींत फुलून दिसायलाहि अत्यंत मोहक असले तरी परिमळाने ते हिणकसच असते.

**ताराबाई**-एवढा खोल विचार करण्याची पात्रता आम्हां बायकांतच काय पण पुरुषांत देखील क्वचित्च आढळते. निदान भावजींनी तरी एवढा खोल विचार कधींच केला नाहीं एवढेच नव्हे तर मिळेल त्या बऱ्याबाईट प्रकाराने मनसोक्त विलासोपभोग हे एकच त्यांचें तत्त्व आम्हाला दिसते,

**राजाराम**-आणि तिथेंच आपण फसतां. कावीळ झालेल्या दृष्टीला प्रत्येक वस्तू पिवळी दिसते. म्हणून प्रत्येक वस्तू सोनं मानण्याइतकी आमची दृष्टी स्वार्थान्ध बनलेली नाहीं. त्या दूषित दृष्टीनें आपण दादासाहेबांकडे पाहूं नका. ते कितीही विलासी व उच्छृंखल असले तरी शहाजादीच्या प्रेमाखातर ते धर्मांतर करतील हा आपला ग्रह फोल आहे. स्वतःच्या धर्माचा त्यांना उज्ज्वल अभिमान आहे. धर्मांतराचा प्रसंगच आला तर ते स्वतःच्या प्राणाची देखील पर्वा करणार नाहीत. त्यांच्यासारखी हेकेखोर माणसं तितकीच करारी व खंबीर मनाची असतात. ( सैनिक प्रवेश करतो.)

**सैनिक** – (मुजरा करून) महाराज, आघाडीवरून अम्बाजी आला आहे.

**राजाराम**-जा. पाठवून दे त्याला (सैनिक जातो) राणीसाहेब, आपण जरा आंत जाल कां ?

**ताराबाई**–आणि आम्ही इथे असलो तर काय बिघडणार आहे ?

**राजाराम**–कांहीं कांहीं गोष्टी षट्कर्णी होऊं नयेत अशा असतात. त्यांतून स्त्रियाना तर मुळींच सुगावा लागतां कामा नये. त्यांच्या चंचल स्वभावानुसार कोणतीही गोष्ट त्यांच्या पोटांत सामावत नाहीं. शुक्राचार्यांची संजीवनी विद्या देवयानीच्या चंचल स्वभावामुळेच षट्कर्णी होऊन निष्फळ झाली आणि देवांचा डाव साधला.

**ताराबाई**–पत्नी ही पतीला मंत्र्यासमान असते मी आपली अर्धांगी आहे. आमच्या हक्काची होत असलेली ही पायमल्ली आम्हाला खपणार नाहीं.

**राजाराम**–होय, पत्नी ही गृहराज्यांत पतीला मंत्र्यासमान असते हें आम्हाला मान्य आहे व त्याच मर्यादेनं आम्ही आजपावेतों आपल्याशीं वागलो. पण गृहराज्य म्हणाजे लोकराज्य नव्हे. तत्त्व जरी एक असलं तरी क्षेत्रभिन्नत्वामुळें कधी कधीं तत्त्व त्यागाचा प्रमाद करावा लागतो. शिवाय प्रत्येकाचे अधिकार मर्यादित असावेत. अमर्याद अधिकाराचा उन्माद सर्वस्वाच्या नाशाचें बीज होय. आज आपण त्याच उन्मादाची फळे भोगीत आहोंत. वहिनीसाहेबांच्या कृपेची पाखरं जर आपल्या शिरावर नसती तर सोयराबाईसाहेबांचीच गत नशिबीं लिहिली होती. वडील भावजय मातेसमान असते. त्या आमच्याच नव्हे साऱ्या महाराष्ट्राच्याच माता आहेत.

**ताराबाई**–(संतापानें) मानभावी साळसूदपणा सारा. त्यांना दीराविषयीं जर एवढी आपुलकी होती तर आज आठवडयानंतर त्या गडाबर उगवण्यापूर्वी कुठें गेल्या याची कल्पना करून दिली असती. बिचार

घेतला असतां, पण कांहीं कानासकोन तरी लागूं दिला कां ? देखल्यादेवा दंडवत करण्यांत, नाहींतरी बाई इतकी व।कबगार कुणीच सांपडाणार नाहीं. स्वारीचा मात्र त्यांच्यावर दांडगा विश्वास. भावालाच जिथे दया माया नाहीं तिथे भावजयोला तरी कुठून असणार? आडांतच नाहींतर पोहोऱ्यांत तरी कुठून येणार ?

**राजाराम**-( रागानें) राणीसाहेब-

**ताराबाई**-खवळणारच पित्त. भावजींच खरं अंतरंग उघड करून दाखवलेलें खपेल तर ना ? अंत्रश्रद्धेमुळें त्यांच्या पाषाण हृदयांतसुद्धां देवाचं मंगल रूग भासतं आमचा जन्माचा कोंडमारा खपतो. मराठे साम्राज्यांत आमचा कांहींच कां वारसा हक्क नाहीं. ? थोरले खासे व व्यंकोबा मामंजी भाऊच होते पण त्यांनीं व्यंकोजींना तंजावरसारखा एक प्रांत तोडून देऊन स्वतःच्या बरोबरोचें राजे बनवले पण इथे आमच्या नशीबीं मात्र वारसा हक्कांत जन्माचा बंदिवास वांटयाला आला. बाईंच्या मायेची पांखरं जर स्वामोच्या शिरावर असती तर त्यांनीं भावजींचें मन वळवून बरोबरीच्या मानानें स्वराज्यांत वावरू दिलं असत पण महाराष्ट्रांत दुसरा तंजावर निर्माण होण्याची भिती आहे ना ? आतापावेतों झालं ते पार पडलं. आज आयती संधी चालून आली आहे ती घालवूं नये. असले योग नेहमीं येत नसतात. शिवाय आज आपल्या जीवनांत-- ( ओशाळी होते)

**राजाराम**-(ताराबाईचे आपादमस्तक निरीक्षण करून आश्चर्यानें) म्हणजे आपल्या बोलण्याचा आम्हाला मतितार्थ समजला नाहीं.

**ताराबाई**-( खालच्या मानेने मिस्किलपणें ) वेड पांघरून पेडगांवला जायची नाहीं तरी पुरुषांना खोडच असते स्त्रियांना असं ओशाळं

करण्यात पुरुषांना काय लाभ होत असेल तो होवो.

**राजाराम**–आणि मागचे उकिरडे उकरून पुरुषांना बेजार करण्यांत स्त्रियांना तरी काय लाभ होतो सांगा पाहूं ?

**ताराबाई**–(आनंदाने) जा बाई, असं लाजवायचं असेल तर आम्ही बोलणारच नाहीं आपल्याशीं.

**राजाराम**–(स्वगत) अपत्यलाभाच्या नुसत्या कल्पनेने स्त्रिया किती हेलावतात पण! यामुळें कां होईना वादळ शांत झालं तीच कशीं तरी समजूत घालून सुटका करून घ्यावी हें उत्तम. (उघड) ताराराणी, एकूण आपला कुसवा लौकरच मोहरणार तर !

**ताराबाई**–( खोटया रागाचा आव आणून ) इश्य, अशी नांवानं कां हांक मारायची ?

**राजाराम**–बरं नांव टाकल तर तिकडूनही बायका नवऱ्याच्या नांवानें हांक मारतात. बरं अम्बाजी, आघाडीवरील बातमी आपल्या समक्ष मोकळया मनाने सांगणार नाहीं म्हणून आपण आंत जाल कां म्हणजे त्याला संकोच वाटणार नाहीं. आपल्या अनुमतीनेच पुढचा कार्यक्रम ठरवूं (ताराबाई जाते) कोण आहे बाहेर ? (सैनिक प्रवेश करतो ) अम्बाजीला पाठवून दे. ( सैनिक जातो व अम्बाजी प्रवेश करतो )

**अम्बाजी**–(मुजरा करून) घात झाला महाराज, कबजीनें कावा साधला. खासे गिरफतार झाले, भोंवती सारा डोंब उसळला. मोऱ्यांनीं मात केली, देवाची देवकळा हरवली, मान्यांनीं मासाहेबांना घेरलं पण --

**राजाराम**–घटकेपूर्वीच मासाहेब व बालराजे येथें सुरक्षित येऊन पोंहोचल्या. घाबरण्याचें कारण नाहीं. फार थकल्यासारखा दिसतोस, थोडा विसावा घेऊन सावकाश सांग सारी हकीकत.

**अम्बाजी**–विसावा! धनी हा विसावा घेण्याचा वखत नाहीं. बालराजासह मासाहेब येथे सुरक्षित येऊन पोंहोचल्या हा एक तरी फासा सुलटा पडला. त्यांनीं सारी हकीकत सांगितली असेलच. साउबाबांनीं मासाहेबांची इकडे पाठवणी केल्यानंतर ते बेगम-साहेबाकडे निघून गेले व थोडयाच वेळांत आम्हां तेथें असलेल्या दहा बारा असामींना गिरफतार करण्यांत येऊन संगमेश्वरी नेण्यांत आले व खाशांच्याच तैनातींत ठेवण्यांत आलं पण तिथंही कबजीने कावा साधला. खाशांपासून आम्हाला दूर ठेवण्यांत आले. त्या पूर्वी दोन तीन दिवसाच्या खाशांच्या सहवासांत असतांना त्यांनीं आपल्याला देण्याकरतां ही थैली दिली आहे. ( थैली राजारामास देतो. ) नंतर दोन तीन दिवसांनींच खाशांची बादशहाच्या छावणीकडे रवानगी करण्यांत आली. त्या गडबडींन संधी सांपडतांच आम्ही सारे निसटलो. बाकीचे साथीदार निरनिराळ्या कारभाऱ्यांना खबर देण्याकरतां निघून गेले व मी आपले सेवेत हजर झालो. (राजाराम थैलीला वंदन करतात तोंच चिटणीस प्रवेश करतो )

**राजाराम**–वेळेवर आलात चिटणीस.

**चिटणीस**–आज्ञा महाराज.

**राजाराम**–दादासाहेबांकडून थैली घेऊन अम्बाजी आला आहे. त्यांना संगमेश्वराहून बादशहाच्या छावणीकडे रवाना करण्यांत आले असें अम्बाजी सांगतो. (चिटणीसास थैली देऊन) दादासाहेबांची काय आज्ञा आहे वाचा पाहूं. पण थांबा. आपण वहिनीसाहेबांकडेच जाऊं या. त्या आपली वाट पहात असतील होय ना ?

**चिटणीस**–जशी आज्ञा. (अम्बाजीस) खाशांना बादशहाच्या छावणींकडे नेणाऱ्या तुकडी बरोबर बन्दोबस्ताकरतां कोण होते ? मोरे कां, शिर्केराजे ?

**अम्बाजी**- दोघेही नव्हते. झुलफिकारखां स्वतः होता.

**राजाराम**-शिर्केराजांचा यांत काय संबंध? ते खाशांचे हाडवैरी असले तरी वहिनीसाहेबांचे सहोदर आहेत. स्वतःच्या बहिणीच्या कुंकवावर उदार होण्याइतके शिर्केराजे नादान नाहींत.

**चिटणीस**-क्षमा करा धनी. शिर्क्यांचें शिर्काण झाल्यापासून शिर्केराजे गणगोत विसरले. सूड व सुरा याचा मद माणुसकीला मुकवतो एवढेच नव्हे तर जगाला, स्वतःलासुद्धां विसरण्यास प्रवृत्त करतो. त्यांनीं गडावरसुद्धां फितुरीचें जाळें पसरलें असावें, असा आम्हांला संशय येतो. सूर्याजी किल्लेदारावर करडी नजर ठेवावयास हवी.

**राजाराम**-पण या दोघांचा संशय घेण्यास कारण तरी काय ?

**चिटणीस**-आज गडावर अवकळा पसरली असून काळजीच्या काहूराने सारा गड व्यापला आहे आणि अशा वेळीं किल्लेदाराच्या वाड्यांत मात्र शिमग्याचा नंगा नाच चालू आहे

**राजाराम**-पण शिर्केराजांचा यांत काय संबंध ?

**चिटणीस**-सूर्याजी किल्लेदाराचा यमाजी हा मेहुणा असून तो शिर्क्यांचा शिलेदार आहे. त्याच्या सध्या गडावर बिनाहरकत सारख्या खेपा चालू आहेत. या यमाजीमार्फतच शिर्केराजांनीं सूर्याजीला फितूर करण्याचा कट केला असावा असा माझा एकट्याचाच संशय नसून खुद्द सूर्याजींची पत्नी कमळाहीबाई या बाबतींत साशंक आहे तिनें तर यमाजीला किल्ल्यावर येण्यास बंदी देखील केली आहे.

**राजाराम**-स्वतःच्या पतीला बदफैलीच्या नादी लावणारा भाऊ असला तरी स्त्रियाचा त्याच्यावर रोष राहणारच म्हणून शिर्केराजे व सूर्याजीला फितूरीच्या फंदांत गोवणें रास्त होणार नाहीं.

त्यामुळें परस्परांत नाहक फुटीर वृत्तीच्या वाढीला मात्र वाव मिळेल. आंज आपल्याला आपसांत द्वेष वाढवायचा नाहीं तसे करणे घातुक होईल. वखत बाका आहे खरा पण सावधगिरीने चौकस राहून संशयाची निवृत्ति करून घ्यावी हे उत्तम. पण सध्यां हे सारे विचार बाजून ठेवून खाशांच्या सुटकेचा प्रयत्न करणें हेंच आपले पहिलें कर्तव्य; चला, आपण वहिनीसाहेबांकडेच जाऊं या.

प्रवेश तिसरा समाप्त



## प्रवेश ४ रा

(रायगड किल्ल्यावरील एक रस्ता. अंबाजी रस्त्यावरून येत असतां मागाहून सारजा त्याला बोलावते.)

**सारजा** – अम्बाजी, अहो अंबाजीराव ?

**अंबाजी** – कोण, सारजा आतां ही गोचीड आमच्या राशीला लागणार कां?

**सारजा** – गोचीड म्हणा अगर जळवा म्हणा, कांहींहि म्हणा पण जरा माझ्या घरीं या. थोडी विश्रांती घ्या. उन्हाच्या तडाख्यानें थकल्यासारखे दिसतां. थोड गुळपाणी घ्या.

**अंबाजी**– तुझ्या घरीं गुळपाणी घेऊं, छान. म्हणजे ताडाच्या झाडाखालीं बसून दूध पिण्यापैकींच प्रकार. त्यांतून आलोहि असतो पण मला थोडे निकडीचे काम आहे, तेव्हां हे विश्रांतीचं गुळपाणी अंगीं लागणार नाहीं.

**सारजा** – काम असेल निकडीचें, मी नाहीं म्हणत नाहीं पण तुम्ही माझ्या घरीं येण्यास भिता, ही आहे खरी गोम ना आढेवेढ्याची. शिलेदारसाहेब आम्हा कलावंतिणींनासुद्धां नियमधर्म पाळावे लागतात. त्याशिवाय आम्हाला आमची कला टिकवतां येणार नाहीं. त्यांतून मी आहे देवदासी. तिन्ही त्रिकाल अम्बाबाईची सेवा करावी आणि तिच्या कृपेनें मिळालेल्या वतनावर जगावं. आम्हा देवदासींची वाऱ्यावरी वागणूक अम्बाबाईला खपायची नाहीं. इतकं खोल गिरण्यास जसा तुम्हाला अवधी नाहीं, तसा मलाहि नाहीं पण तुम्हांला महत्त्वाचं एक गुपित सांगायच आहे. तें असं रस्त्यावर सांगतां येत नाहीं. म्हणून तुम्हाला घरीं येण्याचा आग्रह केला. घरीं यायचं नसेल तर नका येऊं पण थोड आडोशाला तरी चला.

**अंबाजी** – (चोहीकडे पाहून) पण आतां या रखरखीत उन्हांत रस्त्यावर चिटपांखरूसुद्धां नाहीं. काय सांगायचं ते इथेंच सांगना झटपट.

**सारजा** – (चोहीकडे पाहून) तुमची इच्छा. काल किल्लेदारानें कमळाबाईंना कैद करून तळघरांत कोंडून ठेविली होती त्यांना अन्न पाणी पोंहोचविणारी दासी माझ्या ऐकिवातली आहे. तिला वश करून घेऊन तिच्या मदतीने कमळाबाईंना सोडवून घरीं नेलं आहे. त्यांना तुम्ही सुरक्षित ठिकाणीं नेऊन पोंहोचवा हेंच घरीं नेऊन सांगणार होते व त्यांची व तुमची गाठ घालून देणार होते पण तुमचा सोंवळेपणा आमच्या वाऱ्यानेंसुद्धां विटाळतो.

**अंबाजी** – काय !

**सारजा** – जें सांगितलं तें अगदीं सत्य आहे अम्बाभवानीचीच शपथ घेऊन सांगते; फसवणूक नाहीं.

**अंबाजी** – ठीक आहे चल. पण लक्षांत ठेव. धोका दिसला कीं प्राण गेला समज (जातात.)

प्रवेश चौथा समाप्त

## प्रवेश ५ वा

( येसूबाईचा महाल. येसूबाई विचार करीत बसली आहे. )

**येसूबाई** – काय ही आमची अवस्था. आई अम्बाबाई अजून तरी तुझे डोळे उघडत नाहींत ना? किती अंत पाहणार आहेस ? पण तुलातरी कां बोल द्यावा ? स्वतःच्या पायावर स्वतःच धोंडा पाडून घेऊन देवाला दोष देण्यांत तरी काय अर्थ? थोरल्या खाशांच्या शिरावर हरघडी कोसळणारे संकटांचे कडे तूं निवारण केलेस तीच तू आज आमचेपासून दुरावत आहेस. खाशांची ही आठ वर्षांची रक्तरंजीत उन्हाळी राजवटच आमच्या आजच्या अवस्थेला कारण. समर्थांचे बोल कानाला कडू लागतात खरे पण त्यांतच कल्याणाची अचूक दिशा दाखविलेली असते. श्रेष्ठांनी स्वारीला केलेल्या बोधांतील पहिला महामंत्र " श्रेष्ठीं जे मेळविले । त्यासाठीं भांडत बसले । मग जाणावे फावले । गलिमासी ॥ " रक्तांगणाने खाशांनीं राजवटीला सुरवात केली. अपात्रीं पात्रता वाढवून राजकारणांत कारस्थानाचा शिरकाव केला. गोब्राम्हण प्रतिपालक, पतिव्रतांचे पाठीराखे या बिरुदावलीला पायदळी तुडवून छत्रपतींचे सिंहासन भ्रष्ट केलं. " राजी राखिता जग । मग कार्याची लगबग । ऐसे जाणोनिया सर्व । समाधान राखावे ॥ या शेवटच्या अमोल बोलावर समाधि बांधून रयतेच्या क्रोधाच्या निखाऱ्यांनीं त्या समाधीवर कळस चढवला, त्याच कर्माची फळे भोगण्याची वेळ येऊन ठेपल्यावर देवाला सांकडे घालण्यांत तरी काय अर्थ? कुडीतून प्राण जात असतांसुद्धां जगण्याची आशा मरत नाहीं म्हणून ते टाळण्याकरितां अंतकाळीं मानव उचक्याचे हाल सहन करतो. तीच आज आमची अवस्था नाहीं ना ?

( अंबाजी, कमळा व सारजा प्रवेश करतात )

**अंबाजी** – ( मुजरा करून ) नाहीं. मासाहेब, परमेश्वराजवळ इन्साफ आहे. हताश होण्याचें कारण नाहीं.

**येसूबाई**– ( न्याहाळून पहात आश्चर्यानें ) ही कोण ? देवदासी सारजा!

**सारजा**– ( हात जोडून ) जी मासाहेब.

**येसूबाई** काय गाऱ्हाणं आहे बाई तुझं ?

**सारजा** – कांही नाहीं मासाहेब दर्शनाकरतां हजर झाले.

**कमळा** – हिनेंच माझी सुटका केली मासाहेब.

**येसूबाई** – ती कशी ?

**सारजा** – मी माझं कर्तव्य केलं. बाईसाहेबांना अन्नपाणी पोंहोचविणारी दासी माझ्या परिचयाची आहे. तिला वश करून घेऊन तिच्या-मार्फत काल रात्री यांची सुटका केली. आज सकाळीं बाईसाहेब नाहीशा झाल्याची किल्लेदाराला खबर मिळतांच त्या गरीब दासीचा कोंडमारा होणार होता, परन्तु सुदैवाने तिला निसट-ण्याला संधी सांपडली. सध्यां तिला मी माझ्या घरांतच लपवून ठेविलो आहे. पण पुढें मात्र तिला व मला बराच त्रास होण्याचा संभव आहे म्हणून आपला आश्रय मिळावा ही विनंती आहे.

**येसूबाई** – पण कमळाबाईवर किल्लेदाराचा एवढा रोष कां ?

**सारजा** – किल्लेदार फितुरीच्या फंदांत सांपडले आहेत. यमाजी शिर्केराजांचे शिल्लेदार असून ते बाईसाहेबांचें बंधू आहेत. त्या यमाजीमार्फत शिर्केराजांनीं किल्लेदारांना वाईची देशमुखी देण्याचा करार करून फितूर केलें आहे. बाईसाहेबांना हें समजतांच त्यांचा संताप अनावर झाला व त्यांनीं यमाजीवर हल्ला केला पण दोघांनीं त्यांना पकडून कैद केलें.

**येसूबाई** – आतां यमाजी कोठे आहे ?

**सारजा** – त्याला किल्लेदारांनीं गुप्तमार्गाने गडाबाहेर काढून दिलें व ते स्वत.सुद्धां पळ काढण्याच्या विचारांत आहेत.

**कमळा** – देवा! काय ऐकते मी हें!! क्षुल्लक स्वार्थाकरतां स्वारी एवढ्या अधोगतीला पोंहोचली तर !!! मासाहेब ! स्वारीस कडक बंदोबस्तांस ठेवावं ही विनंती आहे.

**येसूबाई** – अंबाजी, किल्लेदारांना कडक बंदोबस्तानें नजर कैदेंत ठेवा अशी आमची आज्ञा आहे हे चिटणीसांस कळवा व भावजींनाहि खबर द्या. ( अंबाजी जातो ) सारजे, तूं आज एका मोठ्या कटाचा सुगावा लावून महाराष्ट्राला उपकृत केलसं म्हणून महाराष्ट्रा-च्यावतीने आम्ही ही बक्षिसी देत आहोत ( गळ्यांतील कंठा सारजेस देते. ती घेऊन वंदन करते )

**सारजा** – मासाहेब, हा महाराष्ट्राच्या महाराणीचा प्रसाद मला शिरसावंद्य आहे. बक्षिशीच्या लालसेने मी बाईसाहेबांची सुटका केली नाहीं. आम्ही दोन पिढ्यापासून आपल्या कृपेने महाराष्ट्राच्याच अन्नावर जगत आहोत. खाशांच्या प्रसादाला पाठ दिली तर तो खाशांचा उपमर्द न होतां महाराष्ट्राचा उपमर्द होईल. मासाहेब ही माझी ठेव आपले जवळ असूं द्यावी ही विनंती आहे. हा माझा माझ्या महाराष्ट्राला नजराणा आहे. त्याचा स्वीकार व्हावा ( कंठा येसूबाईच्या पायाशी ठेवून नमस्कार करते ) कटाचा सुगावा लावण्याचें वास्तविक सारे श्रेय बाईसाहेबांना आहे. मासाहेब आपल्या चरणासमक्ष बाईसाहेबांच्या चरणाला स्पर्श करून शपथ घेते कीं यापुढें हा देह देशसेवेच्याच कामीं येईल. या हीन वृत्तीचा वीट आला आहे.

**येसूबाई** – बाई! वृत्ति वाईट नसते व कुळही हीन नसते. वाईटाचा निर्माता जगन्नाथ नसून जग असतं. तुम्ही कलावंत आहांत. कला ही परमेश्वरनिर्मित आहे. तुमची कलावंताची वृत्ति आहे. ईश्वर निर्मितीचा असा उपमर्द करूं नका. तुमच्या वृत्तींतूनच तुम्हाला देशसेवेचें ध्येय गांठता येईल. मनुष्य जन्माने हीन नसतो कर्माने तो हीन बनतो.

**सारजा** – आज्ञा मासाहेब. आपण आज साऱ्या महाराष्ट्राची आपुलकी मायेच्या ओलाव्यानें ओढून घेतलीत; महाराष्ट्राचे महाराणीपदही या पुढें फिके आहे; असली माता आम्हा महाराष्ट्रियांना लाभली हें आमचें भाग्यच आहे. ( जाते )

**कमळा** – (येसूबाईकडे पाहून (स्वगत) आऽहा! हे राजलक्ष्मीचं तेज, महासागराचं गांभीर्य, व मातेच्या वात्सल्याचा ओलावा, या त्रिगुणांचा मंगल संगमच जणू या मुखकमलावर ओसंडत आहे. कन्या, कांता व माता या त्रिगुणातीत एकरुप जगन्नाथच जणू जगाच्या सेवेंत तत्पर असलेला या माउलीच्या दर्शनाने भासतो.

**येसूबाई** – कमळाबाई! कसला विचार करीत आहांत ? माणसानं मनाला एवढं लावून घेऊं नये. ध्येयापासून न ढळता आल्या परिस्थितीला धैर्यानें आत्मसात करून घ्यावे. हा एकच तरणोपायाचा मार्ग.

**कमळा** – परिस्थितीला डगमगून भांबावणारी ही कमळा नाहीं. मी महाराष्ट्राची लेक आहे, आपल्या दर्शनाने मला मातोश्री जिजाबाईसाहेबांच्या दर्शनाचा भास झाला. त्या माउलीचा कुसवा जगतवंद्य शिवप्रभूला जन्म देऊन मोहरला तसेंच त्या विभूतीचें नामधारक बाळराजांना जन्म देऊन आपणहि स्वतःच्या सासूंत एकरुप झालांत. परमेश्वरा ! माझ्या बाळराजांना उदंड आयुष्य देऊन त्यांच्या प्रभेने साऱ्या जगाचें डोळे दिपून जावोत. मला आतां

विचार करण्यासारखं एकच ध्येय, स्वराज्य-सेवा. तोंच माझा संसार.

**अंबाजी** – (प्रवेश करून) हा तुमच्या मुखांतून निघणारा अखिल महाराष्ट्राचा आशिर्वाद फळाफुलाला आल्यावाचून रहाणार नाहीं. मासाहेब चिटणीसांनीं किल्लेदारांना कडक बंदोबस्तांत नजरकैद करून ठेवलं आहे व राजाराम महाराजासह ते इकडेच यावयास निघाले आहेत. .

**येसूबाई** – त्यांना खलबतखान्याकडेच घेऊन या आम्ही तिकडेच जातो.

**अंबाजी** – जशी आज्ञा ( सर्वजण जातात. पडदा पडतो )

प्रवेश पांचवा समाप्त

**अंक पहिला समाप्त**



# अंक दुसरा

## प्रवेश १ रा

( रायगड : खलबतखाना. चिटणीस व राजाराम प्रवेश करतात. )

**चिटणीस**–आईसाहेबांच्या आज्ञेवरून सूर्याजी किल्लेदाराला नजरकैदेत बंदोबस्ताने ठेवला आहे.

**राजाराम**–पण मासाहेबांना सूर्याजीच्या फितुरीची वार्ता समजली कशी ?

**चिटणीस**–अंबाजीच्या सांगण्यावरून समजतें कीं, काल सूर्याजी व कमळाबाई यांच्यात मतभेद होऊन सूर्याजीने कमळाबाईला कैद करून अंधार कोठडीत ठेविले. यमाजीला गुप्तमार्गानें गडाबाहेर काढून दिलें. त्यावेळीं सारजा तेथें होती तिलाही हे किल्लेदाराचें वर्तन आवडले नाहीं. तिनें कमळाबाईना अन्नपाणी नेऊन पोंहोचवणाऱ्या दासीचे मन वळवून तिच्या मार्फत कमळाबाईची सुटका करवली आणि अंबाजीच्या मार्फत मासाहेबांची भेट घेऊन सारी हकीकत त्यांना सांगितली. सध्यां कमळाबाई, त्यांना सोडवून आणणारी दासीसह सारजाबाई आईसाहेबांच्या आश्रयांत आहेत.

**राजाराम**–एकूण गडावरील वातावरण बरंच गढूळ झालेल असून संकटांनीं चोंहीकडून मात केली तर ! प्रसंग गंभीर आहे खरा. अंबाजी, ( अंबाजी प्रवेश करतो ) मासाहेब कुठें आहेत ?

**अंबाजी** – जी धनी. त्या पहा मासाहेब येत आहेत.

( येसूबाई विचार करीत प्रवेश करते. )

**येसूबाई** – (स्वगत) आई अम्बाबाई. काय आब राखशील ती खरी. आज गडावर भावजी व चिटणीस याखेरीज कर्त असं तिसरं कुणींच नाहीं. शिर्केराजांनीं सूर्याजीसारखा मातब्बर माणूस फितवून मराठेशाहीच्या छातीवर आघात केला, इतर सारी कर्ती मंडळी चोंहीकडे पांगलेली. स्वराज्यांत बेबंदशाही माजलेली, फितुरी फैलावलेलीं, माणूसबळाचा तुटवडा आणि आहे तें निष्ठाहीन व बेशिस्त, शिवाय कळसाला पोंहोचलेली आर्थिक अडचण. याचवेळीं भावजी खाशांना सोडवून आणण्याकरितां जाण्याचा निर्धार करीत आहेत. अशा वेळीं एकटे बालचिटणीस गडाचें संरक्षण कसें करणार! कांहीं सुचत नाहीं. (समोर पाहून) कोण? भावजी ( अंबाजीस ) अंबाजी, जा. रावता बंद ठेव. (अंबाजी जातो) बसाना भावजी. असें उभे कां? (तिघेहि बसतात) चिटणीस, प्रल्हादपंत, दाभाडे, संताजी धनाजी वगैरे मंडळींना संदेश पाठवले होते त्यांचेकडून कांहीं बातमी समजली कां ?

**चिटणीस**–संताजी, धनाजी इतक्यात येतीलच. प्रल्हादपंत, दाभाडे, पिंगळे आदि कडून थैल्या आल्या आहेत.

**येसूबाई** – काय लिहितात सरदार मंडळी ?

**चिटणीस**–आतांच थैल्या मिळाल्यामुळें त्या खोलल्या नाहींत. समक्षच फोडून वाचून दाखवतो.

**राजाराम**–शिवाय अम्बाजीबरोबर दादासाहेबांनीं पाठवलेलें आज्ञापत्रहि अद्याप पाहिलें नाहीं.

**येसूबाई** – हो खरंच. अम्बाजीनें तेंहि आम्हांला सांगितलें. काय आज्ञा आहे खाशांची ? ( अम्बाजी प्रवेश करून )

**अंबाजी** – संताजी, धनाजी आले आहेत.

**येसूबाई**– जा पाठवून दे त्यांना. ( अंबाजी जातो. दुसरीकडून संताजी, धनाजी प्रवेश करून मुजरा करतात ) या सेनापती. बसा. ( दोघेहि बसतात ) चिटणीस, वाचून दाखवा पाहूं कोणाकडून काय काय संदेश आले आहे ते व खाशांचे आज्ञापत्रहि वाचून दाखवा पाहू !

**चिटणीस**–आज्ञा, स्वतंत्र महाराष्ट्राच्या मराठी साम्राज्यावर आलेल्या गंभीर परिस्थितीचा विचार करण्याकरितां आज आपण येथें जमलों आहोंत. सूर्याजी फितूर झाल्यामुळें गडाच्या संकटाचा धोका वाढला आहे. ही एक नवीन घटना सोडून बाकी गंभीर वातावरणाची कल्पना आपणा सर्वांना आहेच.

**संताजी** – सक्राजीपंत दाभाडे, पिंगळे वगैरे कारभारी दिसत नाहींत.

**धनाजी**– आम्हाला प्राप्त परिस्थितीची खडानखडा जाणीव आहे. त्यासंबधीं विचार करण्याकरितांच आम्ही स्वतः हजर होणार होतो. तोंच खाशांचीहि आज्ञा हातीं आलीं.

**चिटणीस**–सक्राजीपंत दाभाडे, पिंगळे हे दूरच्या आघाडीवर असल्यामुळें तिकडील राजकारणाची निरवानिरव करून त्यांना वेळेवर हजर होता येत नाहीं म्हणून त्यांनीं आपआपले संदेश पाठवून दिलगिर व्यक्त केली आहे.

**संताजी** – सूर्याजी पिसाळ ! एक जातिवंत मराठा !! महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यावर उदार होऊन फितूर आला !!! हें ऐकून संतापानें आमच्या अंगाची लाही होत आहे. आम्हा मराठ्यांची दानत आज इतकी अधोगतीला जाऊन पोंहोचली तर.

**धनाजी** – गणोजी शिवर्यासारख्या मातबरांनींच पायंडा पाडल्यावर त्यांचेच अनुकरण इतरांनीं केलं नाहीं तरच नवल. परकीय सत्तेच्या

तूपरोटीची लज्जत आम्हा मराठ्यांच्या कांदाभाकरीत कुठे आहे ? मनुष्याची जीभ चवचाल असते पण मन त्याहूनहि चवचाल असते.

**संताजी** – थोरांचे अनुकरण करतांना थोरले खाशे का डोळ्यासमोर असू नयेत? मनुष्याची वृत्ती वाईटाकडेंच कां वळावी? गणोजी शिर्के फुटून बाहेर पडले, ते त्यांच्या भावना दुखवल्या गेल्या म्हणून. बाणेदार पुरुषाला अशा वेळीं आलेला संताप अनावर होतो, आणि त्याच संतापाचे आवेगांत त्यांनीं अघोर प्रतिज्ञा केली खरी पण तीच आज त्यांना जाचक होऊन बसली असेल अशी आमची मनोदेवता आम्हाला सांगते.

**चिटणीस**–सारेच जर गणोजी शिर्के व थोरले खाशे नेहमीच निर्माण होऊं लागले तर इतिहास नांवे बदलण्यापुरतांच मर्यादित होऊन चमत्कृतिनिधान या परमेश्वरी स्वरूपाला बाध आला असता.

**येसूबाई** – गुणावगुणाच्या विवेचनाची कटकट कशाला? सूर्याजी पिसाळ बाईच्या देशमुखीला भाळले म्हणून फितूर झाले हे खरं.

**राजाराम**–पिसाळाची चौकशी होऊन त्यांना शिक्षा व्हावी असें आम्हाला वाटतें.

**संताजी** – मीहि तीच सूचना मांडणार होतो. राजद्रोह्यांना कडक शिक्षा झालीच पाहिजे.

**चिटणीस**–मासाहेबांची काय आज्ञा आहे.

**येसूबाई** – कुणालाहि सन्ताप येईल एवढं अघोर कृत्य सूर्याजीने केलं खरं यांत संशय नाहीं; पण आज त्याचा विचार करण्याची वेळ नाहीं. वाटल्यास नजरकैदेऐवजीं त्याला कैद करा. या घरगुती बाबींकडे सध्यां कानाडोळाच करावा. आपल्या पुढें आज विचार

करण्याची बाब म्हणजे, स्वातंत्र्यावर होणाऱ्या आघाताचें निवारण करण्यासंबंधीचा खल हीच होय. कांहीं तरी निश्चित मार्ग ठरवून त्यानुसार व्यवस्था करणें ही होय.

राजाराम–ठीक आहे. वहिनीसाहेबांच्या आज्ञेबाहेर आम्ही नाही. चिटणीस, दाभाड्याचा संदेश वाचा पाहूं.

चिटणीस–(थैली उघडून पत्र वाचतो) आम्ही पुणें परगण्याच्या राजकारणांत गुंतलो आहोत. वसुलीच्या कटकटी असल्यामुळें आपल्या आज्ञेनुसार ठरविलेल्या वेळीं येथील निरवानिरव करून हजर होता येत नाहीं. दिलगीर आहे. आज स्वराज्यावर क्षणोक्षणीं कोसळणाऱ्या संकटांची बातमी आमच्या हेराकडून आम्हांला खडानखडा समजते. मोंगलांनीं खाशांना गिरफतार करून आम्हा मराठ्यांचा केलेला उपमर्द आम्हाला सहन होणार नाहीं. शक्यतों तांतडीनें हजर होऊन स्वातंत्र्याच्या संरक्षणाकरितां प्राण पणाला लावूं. संताजी, धनाजी यांच्या हालचाली सध्यां तिकडेच आहेत. ते येतीलच. त्यांच्या व आपल्या सर्वांच्या मसलतीने जो ठराव होईल तो योग्यच असेल. आम्ही त्या ठरावाला सहमत आहोत. आम्ही एक दोन दिवसांतच सेवेत हजर होत आहोत. खाशांना मोंगलांच्या तावडींतून सोडवून आणण्याची शक्यतों त्वरा करावी. ही विनंती आहे.

राजाराम–आणि हा सक्राजीपंताचा संदेश. (थैली उघडून वाचतो) आम्ही वाचून दाखवतो. नगर व बीड प्रांतांतील चौथ सरदेशमुखीचा अम्मल बसवून व थकबाकी वसूल करून एक दोन दिवसांत हजर होत आहोत. सध्याच्या परिस्थितीला तोंड देण्याकरितां नारायणाची नड भासणार आहे त्याची तरतूद करणें दिलेल्या मुदतींत साधलं नाहीं म्हणून हजर होतां आलं नाहीं, दिलगीर आहोत. आणि

हा पिंगळ्यांचा संदेश ( थैली खोलून स्वतः वाचून ) पिंगळे गंगथडीकडे चौथ सरदेशमुखीचा अम्मल बसवून दोन तीन दिवसांत येत आहेत. चिटणीस खाशांची काय आज्ञा आहे वाचा पाहूं.

**चिटणीस**-( थैलीला वंदन करून ती खोलून वाचतो ) चि. राजाबाळ यांस अनेक आशिर्वाद वि. हलकटांना वास्तवतेपेक्षां जास्त महत्त्व देऊन हिन्दवी साम्राज्याच्या नाशाला कारण बनलेला, सत्तेच्या मदानें धुंदावलेला तुमचा दादा कृतकर्माचो फळं भोगीत आहे. त्यानें आपल्या आठ वर्षाच्या रखरखीत राजवटीला सोयराबाई मासाहेबांच्या अबलावधानें प्रारभ केला, भरतासारख्या भावाच्या भावना पायाखालीं तुडवल्या, थोरल्या खाशांच्या बिरुदावलीला बोळ फासून छत्रपतींचें पवित्र सिंहासन बाटवले. शिवयींची धडावेगळी होणारी शिरकमळे मला भेडसावीत आहेत. स्वराज्यांतील कर्त्यांच्या क्रोधाचे निखारे पदरात बांधून घेऊन, त्यांनीं माझ्या ठायीं ठेवलेल्या विश्वासाचे दिवाळे काढून पेटवलेल्या माणुसकीच्या होळींत संभाजी जळून खाक झाला. माझा उद्याच्या उगवत्या सूर्याला शेवटचा प्रणाम. माझ्या स्वतंत्र महाराष्ट्राला त्याच्या नादान छत्रपतीचे शेवटचे दंडवत. राजाबाळ, केलेल्या कृत्याची क्षमा कर. तुझ्या दादाला शेवटची भिक्षा घाल. महाराष्ट्राच्या उद्याच्या छत्रपतीला या कुलांगाराचा शेवटचा मुजरा. बाळराजे लहान आहेत. त्यांना छत्रपतीपदाची जबाबदारी झेपणार नाहीं. छत्रपतीची राजसूत्रे स्वतःच्या हातीं घेऊन उद्याच्या स्वराज्याला रामराज्य बनवा. महाराणी येसूबाईचा तुम्हाला विरोध होणार नाहीं. त्या सूज्ञ आहेत. संभाजीने गमावलेला महाराष्ट्राचा विश्वास संपादन करून

त्या आज अखिल महाराष्ट्राच्या मातृपदाला जाऊन पोंहोचल्या. आठ पुत्रांना जन्म देणाऱ्या पत्नीस पतीने मातेच्या मानाने वागवावे, या धर्माज्ञेला अनुसरून अखिल महाराष्ट्रांत मातृपद प्राप्त करून घेतलेल्या येसूबाई मासाहेबांना माझा शेवटचा प्रणाम. जय जय रघुवीर समर्थ. ( सर्व गहिंवरून जातात. )

**राजाराम**–पश्चातापानें पोळलेला जीव जीविताला कंटाळला तरी आम्हाला आमचा छत्रपती प्यारा आहे. आज आम्हा मराठ्यांचे पहिले कर्तव्य म्हणजे माझ्या दादांची–गोब्राम्हण प्रतिपालक श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज यांची–मोंगलांच्या मगरमिठींतून सोडवणूक हे होय. नतर पुढचा विचार.

**संताजी** – खाशांना सोडवून आणण्याची महाराजांची तळमळ योग्य असली तरी स्वराज्याच्या बंदोबस्ताकरतां राजसूत्रे हलविणारा कुणीतरी नेता राष्ट्राला हवा असतो म्हणून महाराजांनीं खाशांच्या आज्ञेवरून राजसूत्रे हातीं घ्यावीत.

**राजाराम**–संताजी बाबा, आपण थोरल्या खाशांच्या राजवटींत स्वराज्याच्या तालमींत कसून निघालेले कर्तबगार आम्हाला आज आमच्या पितृस्थानीं आहांत. आपण दिलेली मसलत योग्यच असणार. पण आज राजसुत्रे हातीं घेण्याची आवश्यकता भासत नाहीं. वहिनीसाहेबांसारख्या चतुर व धोरणी राजलक्ष्मी आमच्यापेक्षांहि राज्यकारभार उत्तम करतील. त्यांना अनुभव आहे तर आम्ही अगदीं अननुभवी. शिवाय आम्ही आज आघाडीवर गेल्यावर मागे कुणीतरी राज्यकारभार पाहण्यास हवाच.

**धनाजी** – महाराजांनीं राजसूत्रेंच हातीं घ्यावयाची नसून त्यांनीं छत्रपतीपद स्वीकारून गडावर स्वतःच्या नांवे द्वाही फिरवावी नंतर आघाडीवर जावें.

**संताजी** – पण आम्ही असतांना महाराजांना आघाडीवर जाण्याची आवश्यकता कां भासावी ? असल्या ऐन आणिबाणीच्या मोहीमा महाराजांनीं जर आमचेवर सोंपवल्या नाहींत तर आमचें अस्तित्व असून नसून सारखेच.

**चिटणीस**–आम्हाला सेनापतींचा विचार सर्वस्वी योग्य वाटतो. महाराजांनीं मासाहेबांच्या सल्याने येथील विस्कळीत परिस्थिती मावरून बंदोबस्त करावा.

**राजाराम**–वहिनीसाहेबांच्या नेतृत्वाखालीं येथील बंदोबस्त करण्यास दाभाडे सक्राजीपंत व पिंगळे दोन तीन दिवसांतच येथे खात्रीने येतील. आज आम्ही आमच्या नांवे द्वाही फिरवून छत्रपतीपद स्वीकारले तर दादासाहेबांच्या अस्तित्वाला बाध येणार आहे आणि ती कल्पना आम्हाला ओंगळ वाटते. संताजीबाबा, आपल्यासारख्या अनुभवी वृद्धांनीं आम्हाला असली अमंगल मसलत सांगावी याचे आश्चर्य वाटते व खेदहि होतो. आज अनायासे स्वतःची कर्तबगारी कसाला लावून पाहण्याचा प्रसंग आला असता आपण आम्हाला त्या संधीचा फायदा करून घेऊं देऊं नये याचें नवल वाटते. स्वतःच्या अनुभवाचें सक्रीय ज्ञान देण्याकरता अनुभवी वृद्धांनीं आम्हासारख्या तरुणांना पुढें जाऊ देणें योग्य नाहीं कां? मोठया वृक्षाच्या छायेखालीं रोपटयांची वाढ खुंटते.

**धनाजी** – सध्याच कारभारी मंडळी येथें येण्याची आवश्यकता भासत नाहीं. त्यांनीं येथे येण्यापेक्षां आहेत त्याच ठिकाणीं राहून तिकडील बन्दोबस्त सावधगिरीने करावा आणि संधी मिळतांच शत्रू प्रदेशांत छापे घालून महाराष्ट्रांत इतस्ततः विखुरलेल्या मोंगलांच्या तुकडया गारद कराव्यात असें आमचें मत आहे.

**चिटणीस**–सूर्याजीने यमाजीला गडाच्या गुप्तमार्गाने बाहेर काढून दिल्यामुळें

यमाजीला गडाच्या गुप्तमार्गाची माहिती मिळाली. शिवाय तो आज बाहेर मोकळा आहे. अशा वेळी गडावर एक दोन तरी विश्वासू कर्तबगारांची आवश्यकता आहे.

**राजाराम**–तीन कर्ते आज तीन ठिकाणीं आहेत. ते तेथेंच असावेत, असा धनाजीचा मानस दिसतो. ते योग्य असले तरी पुणें परगण्याचा बंदोबस्त झाल्यानंतर दाभाड्यांना गडावर बोलावून घेणे वावगे होणार नाही. ( अंबाजी प्रवेश करतो )

**अंबाजी** – कमळाबाईसाहेबांनीं गडाभोंवतीच्या दऱ्याखोऱ्यांतील भिल्ल, कोळी या सारख्या जंगली जातींत प्रचार करून त्यांची महानुभूति मिळवली आहे व ती खबर देण्याकरितां त्या हजर झाल्या आहेत.

**येसूबाई**– जा त्यांना आंत पाठवून दे. (अम्बाजी जातो. कमळा प्रवेश करते)

**कमळा** – मी फिनुरी गडकऱ्याची बायको असून सुद्धां आपण मला खलबतखान्यांत येण्याची परवानगी दिलीत आणि माझ्यावर विश्वास ठेवला यामुळे माझा कार्य करण्याचा उत्साह व हिंमत वाढत आहे. खाशांना मोंगलांनीं गिरफतार केल्याची वार्ता वाऱ्याच्या वेगानें गिरीकंदरांत देखील पोंहोचली असून प्रत्येकाच्या मनावर परिणाम झालेला दिसून आला व त्या दऱ्या–खोऱ्यांतील सारा जंगली समाज खडबडून जागृत झाला आहे. आतांपावेतों आपण त्यांची उपेक्षा केली खरी परन्तु प्रसंगी जिवाची पर्वा न करतां स्वराज्य सेवेला तत्पर असलेल्या समाजापैकीं तो एक समाज आहे असें आढळून आले. आज जवळ जवळ पांचशे भिल्ल व कोळी शिपाईगिरी करण्यास उतावीळ झाले असून संदेशाची वाट पहात आहेत. या जंगली समाजाने आतांपावेतों मोंगल सैन्याच्या लहान लहान तुकड्यावर छापे घालून मिळवलेली लूट स्वराज्य

सेवेकरतां नजराणा म्हणून माझ्या स्वाधीन केली ती मासाहेबांच्या महालांत पोंहोचवून खबर देण्याकरतां हजर झाले. मासाहेबांनी त्या नजराण्याचा स्वीकार करावा.

**राजाराम**–बाईसाहेब आपले महाराष्ट्रावर अनन्त उपकार आहेत. बसा आपण. ( कमळा बसते.)

**येसूबाई** – आतांपावेतों आम्ही आपले वादविवाद व मत-मतांतरे ऐकली. कुणाचेंहि मत गैर नाहीं पण स्वारीचा स्वभाव व करारीबाणा सर्वांच्याच परिचयाचा आहे. स्वारींनीं सर्वस्वाचा त्याग करण्याचा निश्चय केला आहे. या पुढे ते राजकारणात मुळींच लक्ष घालणार नाहींत. पश्चातापाने आत्मशुद्धी करून घ्यावी. असें त्यानीं ठरवले म्हणून त्यांनीं भावजींना स्वत:चे नांवे द्वाही फिरवून साम्राज्याची सूत्रे हातीं घेण्यास आज्ञा केली आहे. स्वारीची सुटका झाल्यावर ते महाराष्ट्रांत येतील असें आम्हाला वाटत नाहीं. भावजीसुद्धां स्वारींचेच बंधू. तेही तितकेच करारी. स्वारीना मोंगलांच्या मगरमिठींतून सोडवून आणण्याची त्यांनीं अम्बाबाईसमोर प्रतिज्ञा केली. ती पुरी करण्याचा त्यांचा हट्ट, या सर्वाचा विचार करतां आम्हाला असें वाटतें कीं भावजींनीं चिटणीसांना बरोबर घेऊन आघाडीवर जावे, ते परत येईपावेतों येथील व्यवस्था दाभाडयाच्या मदतीने आम्ही पाहूं. त्यांना बोलावून घ्यावे. पंत व पिंगळें यांनाहि बोलावून घ्यावे. पिंगळे विशाळगडावर राहून गडासह भोंवतालच्या टापूंचे संरक्षण करतील आणि पंत प्रतापगड संभाळतील. आघाडीवर जातांना भावजींनीं आपला कबिला बरोबर घेऊन तो विशाळगडावर सुरक्षित ठेवून नंतर पुढे कूच करावे. संताजी व धनाजी हे या तिन्हीं गडांच्या आसमंतांत राहून शत्रूस जेर करतील.

**चिटणीस**–कमळाबाई बाईसाहेबांनीं स्वराज्याला अर्थबल व माणूसबल मिळवून देऊन कार्याची मुहूर्त–मेढ रोविलीच आहे.

**राजाराम**–आम्हाला वहिनीसाहेबांची आज्ञा शिरसामान्य आहे.

**संताजी व धनाजी**–आम्ही मासाहेबांच्या आज्ञेबाहेर नाहीं.

**येसूबाई**– चिटणीस, आजची ही सारी हकीकत विश्वासू हेराबरोबर सावधगिरीने दाभाडे, पंत व पिंगळे यांना कळवा. आई अम्बाबाई आपल्या पाठिशीं आहे. आतां पुढील कार्याला विलंब नको.
( पडदा पडतो. )

प्रवेश पहिला समाप्त



## प्रवेश २ रा

( रायगडच्या पिछाडीचें जंगल यमाजी व झुलफिकरखां बोलत असतां पडदा वर जातो )

**यमाजी** – नबाबसाहेब आपण स्वत: येथें येण्याचे श्रम घेण्याएवढें कांही हें काम मोठ महत्वाचं आहे असं नाहीं. आपलेकडून कुणी एखादा मामुली अंमलदार आला असता तरी हरकत नव्हती.

**झुलफि** – देखो यमाजीराव, अजकल किसी पर भरोसा रखनेका जमाना नहीं. इमान व एतेबार का तो दुनिया में पताही नही. खैर तुमको ये रास्ता कैसे मालूम हुवा ?

**यमाजी** – मला किल्लेदारांनीं याच मार्गानें बाहेर काढून दिल आणि हा किल्याचा एक गुप्त मार्ग असल्याचं सांगितलं.

**झुलफि** – अच्छा, तुम किलेपर कहांसे गये और क्यों गये ? और इस रास्ते से बाहर निकलनेकी तुमको क्या जरुरत महसूस हुई ?

**यमाजी** – किल्लेदार माझे मेहुणे असून त्यांनीं मला शिमग्याच्या सणानिमित्त आमंत्रण देऊन किल्यावर घेतलं पण अकस्मात मध्येंच घोटाळा उत्पन्न होऊन आम्हाला धोका वाटूं लागला म्हणून किल्लेदाराने मला या मार्गाने बाहेर काढून दिलें व स्वत.सुद्धां निसटणार होते पण त्यांना संशयावरून गिरफ्तार करण्यांत आलं असं ऐकतो.

**झुलफि** – तेहवार को बुलाये हुये मेहमानको क्यों धोका हुवा ? सिरफ मेहमान नवाजीही थी या और भि कुछ राज था आप में.

**यमाजी** – त्या सार्‍या गोष्टी सावकाश समजावून सांगेन मागाहून. सध्या एवढेंच सांगतों कीं आमची बहीण–किल्लेदारांच्या बायकोने

धोका दिल्यामुळें आम्ही तिला कैद करून ठेवले पण या घटनेचा गवगवा होऊन तिला कोणीतरी सोडवून नेलं आणि किल्लेदार कैद झाले.

झुलफि – अखेर वो राज क्या था जिसकी वजेसे तुम किलेपर गये ?

यमाजी – किल्लेदाराला फितूर करून गडावर कबजा करण्याचा शिर्के-राजाचा कट होता. किल्लेदार फितूर झाले कट कामियाब झाला पण ऐनवेळीं बेत फसला.

झूलफि – अच्छा ! तुम्हारे इस कारगुजारी के सीले में कुछ इनाम इकराम की बातचीत हुई होगी. शिर्केराजाने तुमसे और किल्लेदार से क्या इकरार किया ?

यमाजी – (स्वगत) मोठेच चौकस दिसतात नबाबसाहेब हळू हळू आमचं सारंच गुपित बाहेर काढून घेतलं.

झुलिफ – क्यों यमाजीराव क्या सोंच रहे हो ?

यमाजी – कुछ नहीं खावंद. शिर्केराजांनीं किल्लेदाराला वाईची देशमुखी देण्याचा करार करून मला सातारा परगण्यांत जहागीर देण्याचा वायदा केला म्हणून आम्ही हा धोका पत्करला.

झुलफि – और इस वाकिये की खबर राजासाहबको न देते हुये तुम हमारे तरफ क्यों आयें ?

यमाजी – त्यांना खबर दिली पण सध्यां या बाबतींत ते मूग गिळून बसले आहेत. ( एका दरींतून तुतारीचा आवाज होतो )

झुलफि – ( संशयाने यमाजीकडे पाहून व तलवारीस हात घालून ) ये क्या है यमाजीराव ? ये धोकेबाजी ठीक नहीं. हम तुमारे मरेठों की खसलत को जानते हैं. हम गाफिल नहीं.

**यमाजी** – भिण्याचं कांहीं कारण नाहीं नबाबसाहेब. भिलवाड्यांत लग्न आहे. कांही धोका आहे असं वाटलच तर मी आपल्याला सुरक्षित छावणीत नेऊन पोंहोचवीन. या जंगलातील गुप्त वाटाची मला चांगलीच्र माहिती आहे.

**झुलफि** – एक मामुली वतन के मुकाबिले मे तुम आझादी पर क्यों हात धोये बैठे हो ? शिवाजी राजाने ये आझादी बडी जुस्तजूसे और कोशिससे हासिल की है ।

**यमाजी** – नबाबसाहेब शिवाजी व संभाजी यांच्या राजवटींत जमीन-अस्मानचं अंतर आहे. तुम्ही संभाजीला गिरफतार करून आम्हां मराठ्यावर उपकारच केले म्हणाना. मी तर म्हणतो की आझादीची कल्पना म्हणजे एक काल्पनिक खुळ आहे. कांही मराठे या खुळ्या कल्पनेला हुरळून गेले आणि जन्माच्या सुखाला, चैनीला मुकले. ज्या जीवनांत विलासोपभोग नाहींत ते जीवन कसलं, (पडद्यातून–पुंडलीक वरदा हरि विठ्ठल असा आवाज व टाळ्याचा गजर ऐकू येतो) छे, छे या टाळकुट्यांच्या कटकटीने कान किटले, उठून जाण्याचा वखत आला.

**झुलफि** – ये क्या है ? कौन लोग है य ?

**यमाजी** – ही वारकरी पंथाची बावळट. आऽहा ती ध्यानं पहा. ( वारकरी वेषांत खाद्यांवर पताका घेऊन टाळ वाजवीत अंबाजी व कमळा प्रवेश करतात )

**अम्बाजी / कमळा** – ज्ञानदेव तुकाराम । जय जय पांडुरंग हरी । श्रीज्ञानदेव तुकाराम

**यमाजी** – ये टाळकुट्यांनो! बन्द करा ही कटकट. नबाबसाहेबांना त्रास होतो. ते बादशहाचे मोठे सरदार आहेत तुमच्या सारखे भणंग भिकारी नाहींत.

**अंबाजी** – (कमळेस एकीकडे हळूच) बुरखा घ्या. हा तुमचा भाऊ यमाजी तुम्हाला ओळखील. (कमळा बुरखा घेते) व्हय मावाप आम्ही गरीब वारकरी हौती. जातुया पंढरीच्या वारीला असाढीला पांडुरंगाच दर्सन व्हइल.

**यमाजी** – ए टाळकुटया पंढरपूरच्या मिशाने या तरण्या–ताठया, गोऱ्या–गोमटया नारीला कुठं पळवून नेतोस ? (झुलफिकारखानास एकीकड खुणावीत व डोळे मिचकावीत) पाखरुं गुलजार दिसत. नवाबसाहेब शिकार नामी आहे पहा. ऐती चालून आली आहे.

**झुलफि** – खामोष नादान, हमे इष्कबाजीमें फसानेकी कोशिस मत करो. तुम खियाल करते हो इतने हम उल्लू नहीं है. हमको सल्तनतकी खिदमत करना है, इष्कबाजी नही.

**अंबाजी** – ( कमळेस एकीकडे ) एका तुमच्या भावाची मुक्ताफळ. हा नवाब मुसलमान असला तरी नासक्या विचाराचा नाहीं म्हणून ठीक नाहींतर मोठा कठीण प्रसंग ओढवला होता.

**कमळा** – ( अंबाजीस एकीकडे ) इथे तरी धोका नाहीं. पांडुरंग आहे. आपल्या पाठिशीं.

**झुलफि** – (अंबाजोस व कमळेस) घबरावो नहीं. हम तुमको नहीं सतावेंगे यमाजीराव बस, अब हम यहां नहीं ठैरेंगे. हमारा काम हो चुका ( जाऊं लागतो. )

**यमाजी** – नवाबसाहेब, आमच्या कामगिरीच बक्षिस देण्यास विसरुं नका.

**झुलफि** – नादान दगाबाज, तुमको तुमारे बेइमानीका सीला जरूर मिलेगा. ( निघून जातो. )

**यमाजी** – (स्वगत) खासाहेब खरोखरच निघून गेले हाही फांसा उलटांच पडणार कीं काय ? तरी बरं शिर्केराजांच मन अद्याप दुखवलं नाहीं. हे उपरे बेटे शेवटीं जातीवरच जाणार. (जाऊं लागतो)

**कमळा** – (एकदम आवेशाने ) ए नराधमा थाब. त्या दिवशी निसटलास पण आज बरा आयता सापडलास.

**यमाजी** – कोण ? कमळा ! तू कशी इथे ? आणि हा धटिंगण कोण बरोबर ? जोगीण बनलीस होय ? कां बरं भिकेचें डोहाळे आठवले तुला ? किल्यावर कशी राजाची राणी शोभत होतीस. नवऱ्याचा विश्वासघात करून कायगं मिळाल तुला ?

**कमळा** – अम्बाजी पाहता काय ? पकडा या हरामखोराला, मेला माझचं काय साऱ्या मराठे जातीचा महाराष्ट्राचा काळसर्प आहे. ही डूक धरून दंश करणारी अवलाद आढळेल तेथें ठेचून नाहीशी करावी. नवऱ्याने बायकोचा विश्वासघात केला, देशाचा, धर्माचाही विश्वासघात केला याचं योग्य बक्षिस त्याला मिळालं. आई-साहेबांच्या अनाठायी दयेमुळें तो नुसता कैदच झाला, पण तुझं मरण मात्र आतां टळणार नाही.

**यमाजी** – नवऱ्याच्या कुंकवार उलटणाऱ्या कुलटे थाब. तुझ्या या बेफाम-पणाला कायमचा बांध घालतो बघ. ( कमळेच्या अंगावर चाल करून जातो अम्बाजी मध्ये पडतो )

**अंबाजी** – खामोष, खबरदार एक पाऊल पुढें टाकशील तर, पुरुषासारखा पुरुष असून अबलेवर शस्त्र उचलतोस ? हराम मोतीन मरशील.

**कमळा** – असल्या हरामखोराला हराम मोतसुद्धां मोलाची ठरेल. मी मराठ्याची मुलगी आहे. माझ्या तलवारीच पाणी चाखूं द्या त्याला जरा.

**अंबाजी** – कमळाबाई दूर व्हा. आमच्या माय–बहिणीच्या अब्रूचं रक्षण न करण्याइतकं आम्हा मराठ्यांच मन अद्याप मेलं नाहीं. असें एकच काय दहा यमाजी अंगावर येऊन पडले तरी हा अंबाजी मोरे

माघार घेणार नाहीं. काय हो जहागिरदारसाहेब, तुम्हाला तुमच्या मायबहिणींची लेकी-सुनांची अब्रू विकून सातारा परगण्यांत जहागिर हवी होय ना ?

**धमाजी** – कोण ! अम्बाजी मोरे ! !

**अंबाजी** – होय तुझाच हाडवैरी अम्बाजी मोरे. माझ्या गजरेच्या अब्रूवर दरोडा घालणाऱ्या काळपुरुषा, आम्हा मोऱ्याचे वाडे पेटले असतां प्राणभयाने कदमांच्या घराचा आश्रय घेणारी माझी गजरा तुझ्या इच्छेला बळी पडली नाहीं. तिला तूं आगीच्या डोंबात ढकलून दिलेस. त्या दिवशीं निसटलास पण आता कुठे पळशील.

**धमाजी** – नादान पुरुषा, संभाजीने जावळीची होळी केली तरी भोसल्यांची राखण करतोस ?

**अंबाजी** – होय. ज्या भोसल्यानीं महाराष्ट्राच्या मानेवरील परकीय सत्तेचे जू झुगारून महाराष्ट्राचा स्वाभिमान जागृत केला, अबलांच्या शीलासाठीं, धर्मसंरक्षणासाठीं सुखाची होळी करून, प्राण पणाला लावून राष्ट्रीय भावना जागृत केल्या त्या भोसले कुळाचा अभिमानी बनलो. तुझ्याशीं माझं जेवढं वैर आहे तेवढंच माझं संभाजी या व्यक्तीशी आहे. कुळांतील एखादा घटक कुळाला कलंक लावणारा निपजला म्हणून सारे कूळ वाईट मानण्याइतका दुराग्रही अभिमान मला मान्य नाहीं. स्वकुलाचे शिर्काण डोळ्याने पाहणाऱ्या माउबाबांनीं जे केलं तेच मीही करीत आहे. आम्हाला महाराष्ट्र-कुळाचा आपुलकीचा अभिमान आहे. स्वाभिमानाच्या पडद्याआड धर्माभिमान, देशाभिमान मातीला मिळवणाऱ्या नादाना---

( लढूं लागतात )

**कमळा** – थांबा ज्याने माझ्या कुंकवाला काळीमा लावला त्याला हे प्रायश्चित्त (कटयारीचा वार करते यमाजी पडतो) चला स्वीकृन कापांला शकून तर चागलाच झाला (जातात. पडदा पडतो)

प्रवेश दुसरा समाप्त

**************

## प्रवेश ३ रा

( ताराबाई स्वतःच्या महालात विचार करीत बसली असता पडदा वर जातो )

**ताराबाई**–( स्वगत ) जी संधी मिळावी म्हणून आतापावेतो अनेक प्रयत्न केले, नवससायास केले, स्वारीच्या कानीकपाळी ओरडून त्याच्या रोषास पात्र झाले ती संधी आज दुर्धर प्रसंगासारखी भासत आहे. भावजीच्या बरोबरीनें स्वतःचा स्वतंत्र संसार थाटून बाईंना खजील करण्याची ईर्षा होती पण आज भावजी मोगलांच्या दाढेत सांपडून मरणाच्या दारी उभे आहेत. या कल्पनेनेच अंगावर शहारे उभे रहात आहेत. बालराजासह बाईंची अवस्था पाहून आंतड्यांना पीळ पडतो आणि मनातील खळबळ डोळयावाटे बाहेर पडते. बालराजे व बाईंना इथे एकाकी शत्रूच्या खाईंत सोडून आज आम्हाला रायगड सोडावा

लागत आहे. भाऊबंदकीच्या भावनेमुळें बाईकडे पाहण्याची आमची दृष्टी दुषित होती म्हणून त्यांची निर्मळ वागणूक आम्हाला नेहमीं मलीनच वाटत होती. आज प्रसंगाने आमची दृष्टी निवळली आणि बाईंच्या रुपाची प्रभा डोळयांत भरली. अंधारांतून उजेडांत आलेल्या व्यक्तीच्या डोळयाला अंधारी येते. व ती व्यक्ति भांबावून जाते. तीच आज आमची गत झाली. आई अम्बाबाई, भेटतील कां पुन्हां ही देव माणसं ! !

राजाराम-(एकदम प्रवेश करून) भेटतील. अम्बाबाईची कृपा असल्यावर अवश्य भेटतील पण आपल्याला ही अमंगल शंका कां यावी. मनुष्याने दुष्ट विचारांना कधीहि मनांत थारा देऊं नये. राणीसाहेब, आतांपावेतों वहिनीसाहेबांविषयीं शंका-कुशंकांनी भरलेल्या आपल्या मनाला आज त्यांच देवरुप दिसलं हें नवल नाहीं कां ? संकटपरंपरेच्या वावटळींत सांपडलो असतांहि आपल्या भावनांच झालेलं हे आमूलाग्र परिवर्तन पाहून आनंद वाटतो.

ताराबाई-महाराज, परिस्थितीच्या हेलकाव्यानें मनावरील ताबा नाहींसा झाला होता. आतापावेतों आम्ही स्वकीयावर संतापत होतो पण त्यांच्यावरील प्रत्येक वाईट प्रसंगीं मनांत खळबळ माजत होती व आम्ही ती दडपून टाकीत होतो. आजच्या वादळानें आमच्या मनावर मात केली आणि आमचं खर अंतरंग डोळ्यावाटे बाहेर फेकलं गेलं.

राजाराम-मनुष्याला विकार आणि विवेक अशा दोन भावना असतात. त्यालाच तर त्याची दोन मनं मानीत नाहींत ना ? भोवतालच्या परिस्थितींत विकारांची सारखी गल्लत होत असता विवेक या बेबन्दपणावर आंवर घालण्याचा प्रयत्न करतो. हे द्वंद्व नेहमीं

चालूं असते. संस्कृति व संस्कारानुसार कधी विकार विवेकावर मात करतात तर कधीं विवेक विचारावर दडपण आणतो विकार परिस्थितीनुसार बदलतात तर विवेक अटळ असतो. ( समोर पाहून ) ते पहा चिटणीस आले.

**चिटणीस**–( प्रवेश करतो ) महाराज, मासाहेब येत आहेत.

**ताराबाई**–त्यांना तसदी नको. आम्हीच त्यांचे सेवेत हजर होत आहोत. बालराजांना एकदां डोळा भरून पाहावसं वाटत. थोरल्या स्वाशांची बालमूर्ती बालराजाच्या रुपांत पाहून मन प्रसन्न होत चलायचं ना ?

**राजाराम**–आपली इच्छा. चला ( जातात. पडदा वर जातो. येसूबाईच्या महालात येसूबाई विचार करीत बसलेली आहे. )

**येसूबाई**– (स्वगत) भावजी आज आघाडीवर जाणार! जाण्याचा मुहूर्त जों जों जवळ येत आहे तों तों मनाची उद्विग्नता वाढतच आहे. या निमित्ताने आजपासून आम्हा भोसल्यांच्या एका घराची दोन घरं होत आहेत. जगदंबे, या अमंगल कल्पनेन आजच आमच्या मनांत असा थैमान कां मांडावा. आजपावेतों ताराबाईंच मन आमचेविषयीं गढूळ होतं म्हणून आम्हीही त्यांच्याकडे जरा अनास्थेने पाहत होतो पण आज–नित्याच्या सानिध्याने ज्या भावना भासेनाशा होतात, त्याच सानिध्याच्या दुराव्याने जाचक होतात. बालराजांनी तर आज काकांचा घोसराच घेतला आहे. ते काकांच्या कनवाळू मायेस आजपासून आंचवणार! पुढें कंठाव्या लागणाऱ्या एकाकी जीवनाची कल्पना आजपासून जाचक होत आहे. ( चिटणीस प्रवेश करतो ) झाली तयारी ?

**चिटणीस**–जी होय आईसाहेब आणि ताराबाईसाहेबासह महाराज इकडेच

आपल्या दर्शनाकरतां येण्यास निघाले आहेत. (शिंगाचा आवाज) ती पहा शिबंदी निघाली.

**येसूबाई-** किती आहे शिबंदी ?

**चिटणीस-**सध्या आम्ही जिवाला जीव देणारे निवडक मावळे बरोबर घेतले असून किल्याखालीं गेल्यावर भिल्ल-कोळयांचा दोनशे बेहडा येऊन मिळणार आहे ते पहा महाराज आले ( ताराबाई व राजाराम प्रवेश करतात. ताराबाई येसूबाईस नमस्कार करते व राजाराम मुजरा करतो )

**ताराबाई-**बाई, ( गहिंवरून येसूबाईस मिठी मारते. येसूबाईसहि गहिंवरून येते. )

**येसूबाई-** ताराबाई ! गांवीं जावयास निघतांना डोळयाच्या कडा ओलावू नयेत. अपशकून आहे तो.

**ताराबाई-**बाई ! बालराजांना जपा, स्वतःच्या प्रकृतीला जपून रहा. भावजी परत आल्यावर पुन्हा जवळ बोलावून घ्या. एकलकोंड दूर लोटू नका. आजपावेतों आपल्या कृपेच्या सावलींत वाढलो. बाहेरचा कडक उन्हाळा सहन होणार नाहीं.

**येसूबाई-** ताराबाई ! असं अनखर कां वाटून घेता, सुखासुखी कां आपण वेगळी होत आहोत. प्रसंगाला धैर्यानं तोंड द्यावं. प्रकृतीला सांभाळून रहा. आई भवानीवर विश्वास ठेवा ( राजारामास ) भावजी आयुष्यांत हीच पहिली मोहीम आहे. नानाप्रकारचे प्रसंग येतात त्या वेळीं कच खाऊन लढाईला पाठ दाखवू नये. धोरण व हिम्मतच समरांगणावर प्रभावी ठरते. प्रतिपक्ष सर्वांगाने सुसज्ज आहे तर आपण त्या दृष्टीने अगदीं पंगू आहोत. अशा वेळीं हिम्मत व युक्तीनेच निभाव लागतो. चिटणीस, भावजींना अंतर देऊं नका.

**राजाराम**–वहिनीसाहेब, आतां आपले भावजी कुक्कुलबाळ नाहीं. भोसले घराण्याचा थोडाबहुत अनुवंशिक गुण रक्तांत जन्मतःच मिसळलेला आहे. शक्तिमान महाराष्ट्राच्या मायमाऊलीचा–आमच्या मातृतुल्य वहिनींचा–आशिर्वाद आम्हाला धीर व धैर्य देईल. आई अम्बाबाई आमच्या पाठिशीं आहे. आपण काळजी करुं नये. येतो, चला चिटणीस ( राजाराम येसूबाईस नमस्कार करीत असतां त्यांना अडवून )

**येसूबाई**– थांबा. भावजी मोहिमेवर निघतांना वीराला वीरांगना ओंवाळीत असतात. या निमित्ताने तरी लक्ष्मीनारायणाचा जोडा एकदा डोळे भरून पाहू द्या. ताराबाई भावजींना पंचारती घेऊन ओवाळा हो पण अगोदर आम्ही तुमची खणानारळाने ओटी भरून कुंकू लावूं ( तसे करते नंतर ताराबाई राजारामास ओंवाळते ) चिटणीस या आम्ही तुम्हाला ओवाळतो ( तसे करते. ताराबाई नमस्कार करते. राजाराम नमस्कार करतो. चिटणीसहि नमस्कार करतो. पडदा पडतो. )

प्रवेश तिसरा समाप्त



## प्रवेश ४ था

( एक जंगल. संताजी व धनाजी बोलत बसले आहेत )

**संताजी** – या कांदा–भाकरीची लज्जत कांहीं और आहे खरी.

**धनाजी** – सध्याच्या धावपळीच्या धांदलीत झालेल्या श्रमापुढें पोटाला ताण बसल्यावर कोंडयालासुद्धां मांडयाची लज्जत येईल. ही तर कांदा–भाकर आहे. खाशांना पकडून आज जवळ जवळ सात आठ दिवस होऊन गेले असतील. या अवधींत विश्रांतीला वाव मिळाला कां ? खाल्लेलं अन्नसुद्धां अंगी लागत नाहीं. कर्तव्य करण्याकरितां ताकद व तकवा यावा म्हणून ज्यावेळीं जे मिळेल त्याने पोटाची खळगी भरायची कशीतरी. काय आपली दुर्दशा. गडावर बालराजासह मासाहेब एकाकी झालेल्या. सूर्याजीच्या फितूरीनें गडाच्या व राजकुटुंबाच्या संरक्षणाची जबाबदारी एकटया दाभाडयावर पडलेली आणि माणूसबळ तोटक. ताराबाईसाहेब विशाळगडावर तर राजाराम महाराज व चिटणीस आमच्यासारखे वणवण फिरत आहेत. कुणाची कुणाला भेट ना गाठ.

**संताजी** – पांडवांनीं एक वर्षाचा अज्ञातवासाचा काळ कसा काढला याची खरी कल्पना आतां आपल्याला येत आहे. बारा वर्षाचा वनवास पत्करला पण हा अज्ञातवास नको. राजघराण्यांतील सर्व घटकांनीं एके ठिकाणीं राहणें सध्याच्या परिस्थितींत धोक्याचें वाटल्यावरून सर्वानुमते ताराबाईसाहेबांना विशाळगडावर नेऊन ठेवले पण त्यामुळें आमच्या कार्यक्षेत्राची जबाबदारी वाढली व एकसूत्रीपणा नाहींसा झाला. ही आणिबाणीची कसोटीची वेळ धैर्यानेच निभावून नेली पाहिजे.

**धनाजी** – शिवाय मोगल सैन्याच्या टोळया विजयोन्मादानें धुंद होऊन साऱ्या महाराष्ट्रात धुमाकुळ घालीत आहेत. त्यांना एकाकी गाठून जेर करणं हा एकच तरणोपायाचा मार्ग आतां शिल्लक राहीला आहे. आई अम्बाबाईच्या कृपेने भिल्ल कोळयाच्या जंगली टोळ्या जागोजाग मोंगल सैन्यावर छापे घालून लुटमार करीत आहेत, म्हणून आतांपावेतो आपण तग धरून आहोत. या मदती- शिवाय लुटीपैकीहि बराचसा भाग ते स्वराज्याला मदत म्हणून स्व–खुशीने आणून देतात हे सुदैवच.

**संताजी** – हाच आपल्याला शुभशकून व अम्बाबाईचा सुलटा कौल समजून धीरासा वाटतो व आशेला वाव मिळतो. नाहीतर परिस्थितीच्या कोंडींतून सुटणें अशक्यच होते. विश्वासू व योग्य हेरसुद्धां आज आपल्या जवळ नाहीत. ( भजनाचा आवाज ऐकू येतो ) पंढरीचे वारकरी परतले वाटते. (कमळाबाई व अम्बाजी वारक- ऱ्याच्या वेषांत भजन करीत प्रवेश करतात )

**संताजी** – यावं वारकरी महाराज, साधुसंत येती घरा तोच दिवाळी दसरा
( संताजी व धनाजी नमस्कार करतात )

**अंबाजी** – अशी गरिबाची थट्टा कां करतां धनी ?

**धनाजी** – अम्बाजी हा मान तुझा नाहीं, तुझ्या वेषाचा आहे. काय पण सोंग साधलं आहे. आम्ही सुद्धां क्षणभर चकलोच पण या बाई कोण ?

**अंबाजी** – कमळाबाई किल्लेदारीण, सूर्याजी पिसाळांच्या पत्नी.

**संताजी** – या तुझ्याबरोबर कशा ?

**अंबाजी** – किल्लेदाराच्या फितुरीने वेतागून देशसेवेत देह झिजवण्याची शपथ घेतली आहे यांनी. एक वीरकन्या आहेत.

**धनाजी** – वीरकन्या ? ती कशी ?

**अंबाजी** – नुकतीच यांनीं एका राजद्रोह्याला मुक्ती दिली म्हणून.

**संताजी** – कोणाला ?

**अंबाजी** – यमाजी कदमाला स्वतःच्या भावाला. त्यानेंच सूर्याजीला फितू-रीच्या फंदांत गोवल.

**धनाजी** – आतां सूर्याजी कुठे आहे? गडावरची काय खबर ? तुम्ही कुठून आलांत ?

**कमळा** – संताजीबाबा, मी जरा समोरच्या ओढयावर जाऊन हातपाय धुऊन येऊ कां ? तहान लागली आहे.

**संताजी** – हो हो यांना जाऊन (कमळा जाते)

**धनाजी** – यमाजीचा वध का व कसा झाला ?

**अंबाजी** – आपण गड सोडल्यानतर पाठोपाठ मी व कमळाबाई हेरगिरीवर असतांना झुलफिकारखान व यमाजी ही दोघं कांहींतरी खलबत करतांना आढळली. यमाजीनं कमळाबाईंना न ओळखल्यामुळें खानाला तिची आभिलाषा दाखवली पण खानावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. नतर भावाबहिणीत झटापट होऊन यमाची मारला गेला. हेरगिरीवर असल्यामुळं गडावरची आम्हाला कांहीं खबर नाहीं.

**संताजी** – यमाजी, शिर्क्यांचा शिलेदार, शिर्क्यांमार्फत त्याने सूर्याजीला फितूर केला असता खानाशीं संधान बांधण्याची यमाजीला कां गरज भासली ? शिर्केराजांना गडाची चांगली माहिती आहे.

**कमळा** – ( प्रवेश करून ) फितुरीच्या मोबदल्यांत शिर्क्यांनीं यमाजीला जहागीर देण्याचा करार केला असं तो खानाला सांगत होता

पण करारप्रमाणें राजांनीं नंतर तिकडे कानाडोळा केला असेहि म्हणत होता. आतांपावेतों गडावर हल्ला कसा झाला नाही याचेंच नवल वाटते.

**धनाजी** – खाशांना गिरफ्तार केल्याची वार्ता कळतांच साऱ्या महाराष्ट्रांत एकदम हलकल्लोळ माजला. तो दाबण्याच्या कामी खान गुतला असल्यामुळे त्याला गडाकडे लक्ष देण्यास सधी सापडली नसावी पण आतां मात्र गडाला लौकरच वेढा पडण्याचा संभव आहे. आपल्याला गडाच्या बचावाची शक्यतों लौकर तरतूद केली पाहिजे.

**संताजी** – ( थोडा विचार करून ) अम्बाजी आतां तुम्ही शिर्क्यांच्या छावणीत जाऊन हरहुन्नर लढवून राजकुवरबाईची भेट घेऊन त्यांचें मार्फत शिर्केराजांचे मन वळवण्याचा प्रयत्न करा.

**धनाजी** – आम्हाला एक कल्पना सुचली आहे. ती साधली तर आणखीही आमच्या आशेत भर पडण्याचा संभव आहे.

**संताजी** – कोणती कल्पना ?

**धनाजी** – शिर्केराजांशीसंधान बांधून त्यांच मन वळवण्याची.

**संताजी** – कल्पना नामी आहे खरी, पण ती सफल होईल कीं नाही याची शंकाच आहे. ते युधिष्ठिराच्या नीतीनुसार नरो वा कुंजरोवा म्हणून स्वस्थ बसले तरी मोठा कार्यभाग होईल. पण तोहि मार्ग त्यांना धोक्याचाच आहे. ते धुरंधर सेनानी असून विचारीहि आहेत. असा धोका पत्करणार नाहींत.

**धनाजी** – या दृष्टीने विचार केला तर निराशा पदरी पडेल हे निश्चितच. पण विचार करण्यासारखा आणखीहि एक दवा आहे.

**संताजी** – तो कोणता ?

**धनाजी** – संभाजी राजांना शिर्केराजांच्या स्वाधीन न करता शाही छावणीकडे पोंहोचवून शहाने करार मोडला म्हणून शिर्केराजे बिथरले तसेच सारा महाराष्ट्र आज खडबडून जागा झाला आहे. भिल्ल कोळ्यासारख्या जंगली जातीवर देखील तो परिणाम झालेला आढळून येतो. साऱ्या महाराष्ट्राची सुप्त शक्ती जागृत झाली व त्या शक्तीला जणूं चेतावणी मिळाली आहे. शिर्केराजे मराठे तर आहेतच शिवाय शिर्के व भोसले परस्पर वैवाहिक संबंधाने बांधले गेले आहेत.

**संताजी** – पण हा संबंध आज नवीन थोडाच आहे ? असा आतड्या–कातड्याचा संबंध असूनहि शिर्केराजांनीं मराठेशाही विरूद्ध शस्त्र उचललेच कीं नाहीं ?

**धनाजी** – भोसल्या विरुद्ध शिर्क्यांनीं शस्त्र उचलले हे खरं पण त्यावरून ते मराठ्यांच्या स्वातंत्र्याचे विरोधी आहेत असे मात्र नाहीं. स्वकुलाच्या शिर्काणामुळे ते वेडावले व त्यांनी संभाजी राजावर सूड उगवण्याच्या इर्षेने शस्त्र उपसले पण विश्वासघातानें परक्यांनी खाशांना कराराविरूद्ध शहाकडे पोंहोचवल्यामुळें त्यांची सूडाची धुंदी उतरली असावी व सोडल तर पळत व धरल तर चावत या द्विधा मनस्थितींत ते आज बेचैन असावेत असे आम्हाला वाटते.

**संताजी** – कशावरून

**धनाजी** – शिर्केराजांच्या सहोदर भगिनी मासाहेब एकाकी झाल्या आहेत. परकीय त्यांच्या शिलावर व चारित्र्यावर आक्रमण करतील ही जाणीव त्यांना खात्रीने बोचत असेल. निदान बहिणीच्या शील व संरक्षणाकरितां तरी शिर्के राजे वळतील.

**संताजी** – प्रयत्न करून पहा. अपयश आलं तर याही एका अपमानाची गांठो-ड्यात भर पडेल. म्हणून भरल्या गाडीला सुपाचे ओझ थोडेच आहे अशा महत्वाच्या कामगिरीवर पाठवण्यास ही वारकरी जोडीच योग्य आहे. (सारजा घाईघाईने प्रवेश करते.)

**सारजा** – संताजीबाबा राजाराम महाराज विशाळगडावर आहेत अशी खानाला खबर मिळाल्यामुळें तो गडाला वेढा देण्याकरता निघाला आहे.

**धनाजी** – बरं पण महाराज सध्या कुठें आहेत ? तुम्ही देवदासी सारजा होय ना ? आता आज कोठून आलांत ?

**सारजा** – खानाच्या छावणीतून विशाळगडाकडेच मी गेले होते. खानाच्या छावणींत गडाच्या वेढयाची जय्यत तयारी चालू आहे. जलश्याच्या निमित्ताने मी खानाच्या शामियान्यांत जाण्याचा प्रयत्न केला पण खानाने नकार दिल्यामुळें माझा नाइलाज झाला व इतर ठिकाणच्या एक दोन जलश्याच्या बैठकीत बार-काईनें लक्ष देतां असें आढळून आलें कीं खानाने कोणत्या गडाला वेढा द्यावा याचा अद्याप निश्चय केलेला नाहीं. कदाचित दोन्ही किल्ल्याला एकदम वेढा बसण्याचा संभव आहे. म्हणून ही खबर देण्याकरतां इकडे आले. विशाळगडावर महाराज, सक्राजीपंत चिटणीस व महाराजांचा कबिला आहे पण महाराजांना गडावर धोका असल्यामुळें चिटणीसांना बरोबर घेऊन महाराजांनीं गड सोडावा अशी पंताची सूचना आहे व त्यानुसार त्या दोघांनीं गड सोडलाही असेल. पंतानीं आपली कुमक मागितली आहे. आपल्यापैकीं एकाने विशाळगडाकडे व एकाने रायगडाकडे कुमक घेऊन जावे असा पंताचा महाराजांच्या आज्ञेनुसार आपल्याला संदेश आहे हे सर्व या खलित्यांत आहेच (खलीता देते)

**सन्ताजी**– कसोटीचा वखत आहे खरा. बर सारजाबाई तुम्ही आतां रायगडाकडे जा. गडाच्या भोंवतालच्या भिल्ल–कोळ्यांना संकटाची सूचना द्या त्यांच्या मदतीला आम्हीही आमच्या एक दोन टोळ्या पाठवतो. दाभाड्यांनाही सावध रहाण्याचा इषारा द्या. आम्ही कांहीं विश्वासू तुकड्या विशाळगडाकडे पाठवतो. खानाचे लक्ष वेधले जावे म्हणून बादशाहच्या छावणीवर हल्ला करण्याची हूल दाखवीत आहोत असा आमचा संदेश दाभाड्यांना द्या. जा लवकर आतां एकेक क्षण मोलाचा आहे. ( सारजा जाते. अम्बाजीस ) आणि तुम्ही शिर्क्यांच्या छावणीकडे जाऊन शिर्केराजाचे मन वळविण्याचा प्रयत्न करा.

**अंबाजी** – आज्ञा धनी. ( अभंग म्हणत जातात. )

प्रवेश चौथा समाप्त



## प्रवेश ५ रा

( तुळापूरचे स्मशान, अमावास्येची मध्यरात्र, काळाकुट्ट अंधार, भयाण शांतता, मधून मधून विजाचा कडकडाट, मेघांचा गडगडाट चालू असतां साबाजी डोक्यावर गाठोडे, पाठिशी गाठोडे एका हातांत मिणमिण दिवटी व एका हातांत हाडाची नळी घेऊन कावराबावरा भीत भीत )

**साबाजी** –(स्वगत) कसाबसा येथपावेतों तर सुरक्षित आलो. अद्याप गडावरून कोणीच कां बरं आलं नाहीं पण गडावरची कुमक येण्यास अवधी तरी कुठें मिळाला. खाशांचा निरोप घेऊन अम्बाजी गडावर गेला खरा पण तो तिथे पोंहोचला कां मध्येंच त्याला कुणी गिरफतार केलं. माझ्या पाठिशीं असलेल हें महाराष्ट्राच लेण–मराठेशाहीचा जिरेटोप, अशा असहाय्य स्थितीत मी किती वेळ साभाळणार? वेळ मारून नेण्याची खाशाना परोपरीन विनवणी केली पण कांहीं उपयोग झाला नाही. पिंजऱ्यांत कोंडलेल्या सिंहाचा शहाने अपमान केला तोंच त्या सिंहाच्या रक्ताने उसळी मारली आणि शेवटीं डोंब पेटला. अम्बाजी गडावर पोंहोचला देखील नसेल तोंच शहानें खाशांचा निर्दयपणें वध करून त्यांच्या शरीराची खांडोळी करून दहा दिशांना फेकून दिली. ती सारीं गोळा करून छत्रपतींच्या छाव्याला मुक्ती देण्याकरतां लपत छपत येथें आलो (चाहूल) कोणी इकडे येत आहे वाटत ? ( चिटणीस घाईघाईने प्रवेश करतो ) कोण? खंडोबा ?

**चिटणीस**–साउबाबा, राजे कुठें आहेत ?

**साबाजी**– राजे कुठे असतात. तुला माहीत नाहीं.

**चिटणीस**–म्हणजे बाबा तुम्ही काय बोलतां हें ?

**साबाजी**– खरं आहे. तू अद्याप बच्चा आहेस. तुला नाहीं समजणार. बाळ राजे रयतेच्या शिरावर असतात बरं. हे पहा माझे राजे महाराष्ट्राचे महाराजे माझ्या शिरावर आहेत.

**चिटणीस**–( साबाजीच्या डोक्याकडे निरखून पहात ) गाठोडे! कुठल्या प्रवासाची तयारी बाबा ही ?

**साबाजी**– बाळ हें माझं प्रवासी गाठोड नव्हे; महाराष्ट्राचं डबोलं आहे हें. मेलेल्या महाराष्ट्राला, स्वामीहीन स्वराज्याला, हताश मनाला द्वेषाने भरलेल्या दायादांना, गोताना, सर्वांना सर्वतोपरी समजावून सन्मार्गावर आणणारी ही किमयागाराची पेटारी, (हातांतील नळी दाखवून) आणि ही त्या किमयागाराची पुंगी, या पुंगी–पेटाऱ्याच्या सहाय्याने त्या किमयागाराला उद्याचा महाराष्ट्र तारावयाचा आहे.

**चिटणीस**–ही रक्ताळलेली नळी! .कुणाचा खून तर केला नाहींना बाबा?

**साबाजी**– नाहीं पण तो न करतांच चढला आहे. घाबरु नकोस. ( पाठीवरील गाठोडे दाखवून) हा महाराष्ट्राचा, मराठेशाहीचा जिरेटोप; हा राजाराम महाराजांना नेऊन दे. त्यांना माझा दंडवत सांग; म्हणावं; हा मावळत्या सूर्याने उद्याच्या उगवत्या सूर्याकडे पाठवला आहे. थोरल्या खाशांच्या स्वतंत्र मराठेशाहीचें प्रतीक, महाराष्ट्राचे भूषण, याचा स्वीकार व्हावा. साबाजीचा आवतार आतां संपला. त्याला जगण्याजोगं आतां या जगांत कांहीं उरलं नाहीं. थोड्याच वेळांत माझ्या शिरावर असलेला खाशांचा मेला मुडदा आणि साबाजीचा हा जिता मुडदा त्या समोरच्या चितेत जळून खाक होणार. पतीबरोबर सती जाणाऱ्या साध्वी, तूं पुष्कळ पाहिल्या असशाल. पण––

**चिटणीस**-म्हणजे ! बाबा तुम्ही आत्महत्या करणार !!

**माबाजी**- आत्महत्या करूं नको तर काय करूं ? वेड्या जीव गेल्यावर देह कुजवण्यापेक्षां तो जाळलेला बरा नव्हे कां ? त्यामुळें निदान देहाची दैना तरी वांचेल. चिटणीस, आतां मला चितेच्या जाळत्या वेदना सहन होतील पण जिवंतपणांतील पोळत्या वेदना सहन करण्याची ताकद या माबाजींत उरली नाहीं रे !

**चिटणीस**-देहाची दैना वांचेल! (उपहासाने हासून) बाबा कां उगाच पोरासोरी वडीलकीचा अपमान करून घेता ? महाराष्ट्राला चेतावणी देणारी तुमच्या जवळची ही पुंगी पेटारी, तुम्हालाच जर अशी अचेतन करू लागली तर तिची मातबरी ती काय राहिली तुम्हाला तुमच्या राजाबरोबर जाण्यातच हरीख वाटतो, होय ना? म्हातारपणीं स्वार्थ सुटतो व हांव वाढते, हेंच खरं बाबा! आम्हाला सदेह नरकात ढकलून, देहाची दैना वाचवण्याकरतां तुम्ही विदेही होणार पण लक्षांत ठेवा. आतां तुमच्या देहावर तुमचा वारसा हक्क उरला नाहीं; तो बालराजांच्या मत्तेत गेला आहे. साउबाबा, तुम्हाला तुमच्या लेकीची, महाराष्ट्राच्या महाराणीची शपथ आत्महत्येचा विचार सोडा. येथून थोड्याच अंतरावर राजाराम महाराज आहेत. आपण दोघेही त्यांना जाऊन भेटूं या. तुमची ही पुंगी पेटारी ठेवा त्या समोरच्या चिन्नेवर. ही पुंगीपेटारी खरोखरच किमयेने भरलेली आहे या गाठोड्यांतून वाहणारे रक्त उद्या आमच्या रक्ताला उकळ्या फोडील. काट्याने कांटा निघतो या न्यायाने, या गाठोड्यांतील सडक्या मासाच्या दुर्गंधीने आमच्या मनांतील सूडाच्या सडक्या भावना सडून जातील; या हाडाच्या नळींतून वाहणाऱ्या रक्ताच्या प्रत्येक थेंबातून संभाजी निर्माण होतील आणि स्वातंत्र्याची ज्योत सांवरून त्या तेजाने

जगाचे डोळे दिपवतील कधी कधी थोरसुद्धा पोरापेक्षाही घोर चुका करतात, तसं करु नका का उगाच असे हताश होता?

**सावाजी**– उगाच हताश का होता! तुरुगाच्या दगडानासुद्धा पाझर फुटतील इतक्या आर्त व कळवळयाच्या विनवण्या महाराजाच्या दगडी दिलाला पाझर फोडू शकल्या नाहीत त्याना थोरल्या बापाच्या भेटीस जाण्याची हाव अनावर झाली मलाही माझा स्वार्थ अनावर झाला आहे जा दूर हो वडील मागतील त्याप्रमाणे लहानानी ऐकाव त्याचा अपमान करू नये

**चिटणीस**–वडलांचा अपमान करूं नये. किती अमोल बोल बोललात बाबा! पण, आंधळे आजोबा आपल पाऊल खड्डयात टाकीत असता त्यांचे बोट धरून त्याना सरळ मार्गावर आणण्याने नातवाकडून आजोबांचा अपमान होत नाही तो नातवाचा धर्म आहे. नातवाला चालवण्यास शिकवणाऱ्या आजोबाचा हाच हेतू असतो. बाबा तुम्हाला तुमच्या छत्रपतीचीच शपथ हा अविचार सोडा

**सावाजी**– अरे रे! खंडोबा काय केलस हे!! लेकीच्या मयेला पाठ दिली म्हणून का ही नातवाच्या मोहाची तात गळयात घातलीस? सांथीचे सारे पांढरे केस हासत खेळत निघून गेले. आता या साबाजीला कुणाची सोबत राहिली नाही बाळ, माझ्या या पांढऱ्या केसाना काजळी फासून त्याची भुताटकीच्या भयाण स्वरुपाची धिंड का काढणार आहेस? आता मला या जगात जगण्याजोग काय उरल आहे? (चाहूल लागल्यासारख भासवून) सावध, कुणीतरी इकडे येत आहे त्याला तुझा सुगावा लागता कामा नये व हा माझा चोरीचा मालही कुणाच्या दृष्टीस पडू नये. स्वतःचा माल चोरीची मालमत्ता बनून मालकालाच चोर

बनवणारे असे कितीतरी प्रसंग या जगात घडून येत असतील
( मोठ्याने हांसतो )

**चिटणीस**–मला सावध राहण्याची सूचना देतां आणि बाबा, तुम्ही हे केवढ्या मोठ्याने हांसता !

**खाबाजी**– चोरच मालकाला चोर बनवू लागले तर हासू नको तर काय करू ? रडण्याचा अतिरेक झाला म्हणजे रडण्याचं वेडयाच्या हास्यांत रुपांतर होते, भीतीच्या भावना मरतात, मी तुला सावध केल ते माझ्यासाठी नव्हे; मला आतां हांसत हासत मरायचं आहे. तू येथून जा लौकर. हा जिरेटोप–कालच्या देवाचं लेणं उद्याच्या देवाकडे सुरक्षित पोंहोचव व गो–ब्राम्हण प्रतिपालक, पतिव्रताचे पाठिराखे श्रीमंत छत्रपती राजाराम महाराजांना माझा दंडवत सांग. रायाजीला गडावर जाऊन गांठ तेथे मासाहेब एकाकी आहेत, त्या दुःखाने बेभान झाल्या असतील; त्यांचे सांत्वन करून धीरासा दे; तू स्वतःच्या हातीं सतीच, सत्याच वाण घेतलं आहेस त्या पायीं तुझे आजोबा सागरांत बुडवले गेले, तुझे वडील हत्तीच्या पायीं चिरडले गेले आणि तूहि वाघाचं कवळ बनवला जाणार होतास. तुम्हा स्वामिनिष्ठांच ते ब्रीद आहे बाळ तू वाघाचं कवळ बनण्याकरता जन्माला आला नाहींस वाघाला स्वत.च कवळ बनवण्याकरता तुझा अवतार आहे. तुला तुझा देह स्वामीसेवेंत झिजवायाचा आहे, मेलेल्या महाराष्ट्राच्या मनाला तुझ्या हातच्या चिटणीशी वळणाने जेनबून मराठेशाहीची अंधुक ज्योत सांवरून उजळायची आहे. तू आज मोकळा नाहींस शंभूराजांनीं माजवलेल्या बेबंदशाहीला श्रीमन छत्रपती राजाराम महाराजांच्या राज्यांत रामराज्य बनवायचं आहे. मी ज्या या माझ्या हाताने शंभूराजाचं शुभमंगल उरकलं त्याच या माझ्या

हातानें त्याचं शेवटचं मंगल उरकू दे. मला आतां वेळ नाही. ते पहा राजाराम महाराजच इकडे येत आहेत वाटतं. त्याना येथे येणें धोक्याच आहे. म्हणून त्यांना सुरक्षित गोटांत नेऊन पोंहाचव. (चिटणीस जातो) आतां मार्ग मोकळा झाला. साथीदारानी सहवास सोडल्यावर जीवनांतील जोम नाहींसा होतो. जीवाच्या मोलाने जपलेल्या राजांना माझा सहवास कंटाळवाणा वाटला म्हणून मी त्यांना सोडू कीं काय ! सर्जेखाशांनीं माझ्या माभाळी ठेवलेली ही ठेव तितक्याच विश्वासाने मला त्यांचेकडे पोंहोचती केली पाहिजे. ( डोक्यावरील गाठाडे चितेवर ठेवतो. हातातील हाडाची नळी चितेजवळच थोडया अंतरावर ठेवतो.) ही शंभू-राजांच्या उज्वल धर्माभिमानाची आठवण, यावर उद्याचा महा-राष्ट्र समाधी बांधून त्यांचं ध्येय डोळयासमोर ठेवील. मला आतां या जगांत जगण्याजोगं कांहीं उरलं नाही. ( पडद्यांत– महाराज ते पहा साउबाबा हताश होऊन आत्महत्या करीत आहेत. चला लवकर) चिटणीस राजाराम महाराजांना घेऊन येतो वाटत. (चितेला अग्नी देऊन आडोशाला जातो व तेथून ) हे शुभंकर शंभो. हा घ्या साबाजीचा शेवटचा दंडवत (किंचाळी व नंतर शांतता. चिटणीसासह राजाराम प्रवेश करतो.)

**चिटणीस**–साउबाबांनीं शेवटीं धोका दिला वाटतं! ही त्यांचीच शेवटची किंचाळी. (चितेजवळ जाऊन दोघेही चितेस वंदन करतात. चिटणीसाला चितेजवळ हाडाची नळी सांपडते ती घेऊन) महा-राज ही पहा शंभूराजानीं धर्माकरता, स्वत्वाकरता, केलेली हाडाची काडं. साउबाबांनीं तीं न जाळता जपून ठेवलीं आहेत. ही महाराष्ट्राच्या भावनांना चेतावणी देणारी संजीवनी आहे. ( ती नळी पुरीत असतां रक्तबंबाळ अवस्थेत कबजी बावन्या धावन्या प्रवेश करतो )

**कबजी** – (केविलवाणा होऊन) वांचवा, कुणीतरी मला वाचवा. मोंगलांचे यमदूत माझ्या पाठिशीं लागले आहेत त्यांचेपासून माझं मरक्षण करा. ब्राम्हणाला जीवदान द्या कोण ? चिटणीस, राजाराम महाराज, (राजारामाच्या पायावर लोळण घेतो) महाराज या गरीब परदेशाला आश्रय द्या. मराठे कर्णालाही लाजवणारे दाते व दयेचे सागर असतात. राजे या पांथस्थाची करुणा येऊ द्या.

**चिटणीस**–( संतापाने चिडून ) कोण ? ओ हो. स्वतंत्र मराठेशाहीचे वजीरे–ए–आजम; संभाजी महाराजाचे काळीज काबीज करणारे कबजी; किती तोफांच्या सलामीने तुमचे स्वागत करूं किती अबलांच्या शीलाची आहुती तुमच्या स्वागताच्या ओवाळणीत टाकूं ? दिल्ली दरबारची छत्रचामरं शिरावर ढळत असतां आलमगीर बादशहाच्या दख्खनच्या सुभेदाराला आम्हा गरीब मराठ्यांची तोटकी दया कशी तारील ? कर्तुंमअकर्तुंम शक्ति अंगीं असणारांनी दयेची भीक कां मागावी? वजीरसाहेब, आम्हां मराठ्यांच्या हृदयांत आतां दयेचे पाझर फुटण्या इतका ओलावा उरला नाहीं हो! खावंदांच्या रखरखीत उन्हाळीं राजवटींत सारी आर्द्रता सुकून गेली. धनी, बाळाजीपंतांना हत्तीच्या पायीं देतांना तुमच्या हृदयांताल दयेला उकळ्याच फुटल्या असतील होय ना? शिवर्याच शिर्काण करतांना कनोजच्या बाजारांत दयेचे भाव कडाडले होते होय ? जावळीच्या होमकुडांत दयेची आहुती दिली होती वाटते ! शिवशाहींतील कर्तबगार कर्त्यांच्या दाती तृण देतांना तुमच्या दिलांत दयेचं दंव पडलं नव्हतं वाटतं. काळ्या उन्हाळ्यात जिवंत झरेसुद्धां सुकून जातांत. दयेचं दहिंवर दिसण्यासाठीं परोपकारी पावसाळ्याला स्वत्वाची मुबलक खैरात करावी लागते. अपात्रीं दया दाखवून वर देणाऱ्या भोळ्या शंभूला स्वतः दग्ध होण्याची पाळी येते आणि स्वतःच्या

बचावाकरतां महाविष्णूस अवतार धारण करण्यास विनंती करण्याची पाळी येते. आमच्या भोळया शंभूनें स्वतःच्या हृदयांतील सारी दया तुम्हाला दान देऊन स्वतःची होळी करून घेतली. ती पहा ती तुमच्या समोर धगधगत आहे. भाऊबंदकीचं प्रखर, होमकुंड पेटवून त्यांत मराठेशाहीच्या स्वातंत्र्याची आहुती अद्याप द्यावयाची आहेना ? राजाराम महाराजांच्या निर्मळ स्वभावांत भाऊबंदकीची वेडीवाकडी वळण दाखवून भरताच्या भरलेल्या भावाला कारावासांत डांबवला. त्याच त्याच राजाराम महाराजास आज दयेची भीक कां मागावी. कोवळया पोराचं कवळ करून वाघाच्या दाढेत देताना जगातील सारी दया नाहिशीं झाली होती का? नराधमा स्वतःला ब्राम्हण म्हणवतोस व दयेचं दिवाळ काढून आज आमचे जवळ भीक मागतोस ? सभाजी महाराजांचा एकेक अवयव त्यांच्या धडापासून वेगळा होत असतां तुझ्या हृदयांत दयेच्या उकळया फुटल्या असतील नाहीं! वजीरसाहेब, दया इतकी सवंग नाहीं. तुम्हांला त्याचा अनुभव आहे. दख्खनच्या सुभेदारीकरतां तुम्हाला तुमची सारी दया पणाला लावावी लागला. तुमच्या कर्तबगारीच आज सार्थक झालं आतां दख्खनचीच काय साऱ्या नर्कसाम्राज्याची दौलत आनंदाने लुटीत रहा. बादशहाने तुम्हाला तुमच्या कर्तबगारीच योग्य बक्षिस दिलं. आम्हा मराठ्याच्याही हृदयांत त्यांच्या वजिराविषयीं थोडी निष्ठा उरली आहे ती व्यक्त करण्याकरतां ते फूल नव्हे फुलाचा पाकळी म्हणून तडकाफडकी मरण बहाल करीत आहेत. आतां बोलण्यास सवड नाहीं. घे देवाचं नांव व हो मरणाला तयार. (वार करतो. कबजी पडतो. )

**राजाराम**–शाबास चिटणीस, तुमचा हा मल्हारी म्हाळसाकांताचा अवतार आज आम्हा मराठ्यांना तारील, जा. निष्ठावंतांना मेळवा.

स्वकीयांना कळवा. टाहो फोडून, घसा कोरडा करून सांगा, त्यांचा राजा गोब्राम्हण प्रतिपालक पतिव्रतांचा पाठिराखा श्रीपत छत्रपती शिवाजी महाराजांचा छावा शेवटीं धर्माकरतां महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचे संरक्षणाकरतां शेवटीं राज्यसंन्यास घेऊन, अखिल भारतांत अखंड किर्ती संपादन करून, बापसे बेटा सवाई असा माझा दादा स्वर्गात तळपू लागला त्याने मोठ्या आस्थेने थोरल्या खाशांचा जिरेटोप तुमच्या कर्तृत्वावर विसंबून स्वाधीन केला आहे. त्याच्या तेजाकडे पहा. त्याची लाज घालवूं नका. ही आम्हा भोसल्यांचीच मिळकत नाहीं स्वतंत्र मराठी साम्राज्याची, सनातन धर्माची, श्रीमत समर्थांनी मराठ्यांच्या साभाळी ठेवलेली ही ठेव आहे. स्वाभिमान्यांचं हे पवित्र तीर्थ आहे. आपसांतील सूडाच्या भावना सोडा. माझ्या दादाला क्षमा करा. त्यांच्या पत्नीच्या पावित्र्याकडे पहा, बालराजांच्या केविलवाण्या नजरेला नजर भिडवा, आई अम्बाबाईच्या संदेशाला जागा. एक व्हा. रडत बसण्याची वेळ नाही. कवजीच्या कच्छपि लागून कुटिल कारस्थाने करणारा खुनशी संभाजी मेला. जळून खाक झाला. तुम्हा कर्तृत्वानांना वाव देणारा, धर्माकरतां आत्मबलिदान देणारा शिवछत्रपतीचा छावा तो पहा अंतराळांत वावरत आहे. त्याला मुक्ती द्या. उठा हर हर महादेव बोला. ( पडदा पडतो. )

प्रवेश पांचवा समाप्त



# अंक ३ रा

## प्रवेश १ ला

( शिवर्यांची छावणी भोंवतालचे जंगल. कमळा प्रवेश करते. )

**कमळा–** (स्वगत) वा काय पण सोंग साधलं आहे. असंच काम साधलं म्हणजे मिळवलं. घरधनी फितूर झालेलें पाहून मनाची तळमळ सारखी जिवाला जाळीत आहे. त्या दिवशीं उतावळेपणाने मी विरोध केला हेंच माझं चुकलं. त्या दोघांच्या कटांत आपणही सामील आहोत असा बहाणा करून अम्बाजी मार्फत मासाहेबांना खबर देऊन दोघांनाही गिरफ्तार करता आलं असतं व खानाला यमाजीकडून गुप्त माहिती मिळाली नसती पण आतां काय उपयोग संतापाच्या भरांत कांहीं न सुचून मीच माझ्या पायावर धोंडा पाडून घेतला. सारजाबाईंनीं सोडवलं नसतं तर अंधार कोठडीतच प्राण गेला असतां आणि आज जी थोडीबहूत सेवा घडते तिलाहि अंचवले असते. ( अम्बाजी वासुदेवाच्या वेषांत प्रवेश करतो ) या देवा नवसाला पावा.

**अंबाजी –** पावेल. पण आली वेळ धीराने निभवून नेली तर आणि वेड्यागत विचार करीत राहिलांत तर संशय येऊन फसगत व्हायची. आपण आतां हेरगिरीवर आहोत. सावध रहा. राजकुंवरबाईंना हरहुन्नर करून गांठा. कामगिरी फार नाजुक आहे. हं ती पहा छावणी. पहाराही जरा ढिलाच दिसतो आहे दोनच शिपाई दिसतात व तेही साखर झोपेंत पेंगत आहेत असें वाटते. शिरा आंत रामपहाऱ्याची वेळ आहे. मीहि तुमच्या पाठोपाठ आहेच

पण आपली ओळख आहे हे मात्र कोणास कळं नये हें लक्षांत ठेवा. मी आल्यावर भांडणसुद्धां उकरून काढले तरी चालेल. ( पडदा वर जातो ) ( शिर्क्याच्या छावणीचा मुख्य मार्ग पहाऱ्यावर दोन मराठे पहारेकरी पहारा करीत आहेत. )

**सटवाजी**– सावध. ते पहा समोरून कोण येतय.

**पिराजी** – दुसरं कोण येनार जी रामपहाऱ्याच्या वर्त्ती. ( न्याहाळून ) मुरळी है जून. (कमळा प्रवेश करते)

**कमळा** – नाईक, लावा हा भंडारा. रामपहाऱ्याचा वखत हाय. कांहीं दान करा पुन करा. दान द्या. आलंगिरी, शिवराई, ध्येला पैसा द्या. एखादं वस्तर द्या जुन पुरान. मन घावल, अस्तुरी मिळल. प्वार होईल.

**सटवाजी**– ये मुरळे कार बटवट लावलियास हतं. आम्हाला अस्तुरी हाय अन पोर बी हायत मायंदळ. ही कुणाची छावणी हाय ठाव न्हाय व्हय तुला ?

**कमळा** – ठाव कामुन न्हायजी. पन शिर्केराजा बी मराठेच हैती.

**सटवाजी**–व्हय व्हय, हैती मराठेच. पन मोंगलांचे मातबर सरदार हैती.

**कमळा** – तेबी ठाव हैजी. पन हिंदूच हैतना ते ? मानकरी असोत न्हायतर सुभेदार असोत. आम्हाला भीक माग्याला हो काय त्येच. आम्हा गरिबासनी मुसलमान बी तितकच अन हिंदू बी तितकचं. पोटाला देईल तो परमेसर. चार खुटावरच चौघर होत आम्ही.

**पिराजी** – न्हाय तर आताशा भिकाऱ्याच प्याव फुटल्यावानी दिसतया उठ सुट माग भीक. काय झालं ग तुला भीक मागाया? घरधनी न्हाय व्हय तुला पोसाया ? चांगली धडधाकट हैस, तरनीताठी

नीटनेटकीबी हैस. कुठंबी काम कराव अन प्वॉट भराव. तुझ्या-सारखीला अस वाऱ्यावरी वावरनं चांगलं न्हाय बरं

**सटवाजी**– ( डोळे मिचकावून मिस्कीलपणें ) काय राव तोंडाला पानी सुटलं व्हय ? ही हाय मुरळी लग्न न्हाय करीन. माळावरली माती कुनीबी उपसावी (कमळा रागाने पहाते) ए आवा. अमं डोळं वटारूनशान काय बघतियास ? नाईक हैती हे आमचं गुलजार है गडी. तळहात गौरीवानी वागवल.

**पिराजी** – अरं बाबा मला न्हाय पचायची ही माळावरली माती. मला हैं माझी घरधनीन घरी. मगं बगतुयास काय ? हान की शिकार. साजरा दिसतुया जोडा. म्हसुबाला न्हाई बाईल अन् सटवाईला न्हाई दादला.

**सटवाजी**– नाईक ती घरधनीन झाली घरची. अन् हे बी एक मुसाफरी खटलं बर है.

**कमळा** – अशी गरिबाची मस्करी कामून जी. वावधान उठलं म्हनजी डोळयांत धूळ जाऊन अंधळ व्हायचा वखत येईल. तुम्हाला माय भैंनी हैत कीं न्हाय कुनी ?

**पिराजी** – अरं ती बारा गांवची पानी पिली है. बोलभांड मुलूख मैदान आपल्याला दाद देईल व्हय ती. कशा पायी तिच्या वाटसी जातुयास ए मावशे हत कायबी मिळनार न्हाय तुला. जा तकड दलबादल डेऱ्याकडं शिर्केराजाचा कबिला हाय तत रानीसाबबी हैती. नशीब घेऊनशान गेलीस तर जन्माची ददात व्हईल दूर

**कमळा** – आम्हा गरिबासनी कोन जाऊ देईल जी तत ?

**सटवाजी**–अव, नाईक जा म्हनत्यात ना ? मग कोन अडवनार है आता ( जाऊ लागते. तो अम्बाजी प्रवेश करतो )

**कमळा** – (अम्बाजीकडे रागाने पाहत) हा अनखी कोन उपटसुभ वाटे करी

**अंबाजी** – ए माय, म्याबी है तुझ्यावानी एक पोटभरू तुह कामुन प्वाट दुखतया. असल कांही महा शेर मलाबी मिळल.

**पिराजी** – अर असं कां एकमेकावर गुरगुरता कुतऱ्यावानी ?

**अंबाजी** – न्हाय तर काय धनी. मानसाला कुनाच त्री बरु खपन न्हाय बगा लय इटबना झालीया, जगाची, ( खुणावतो. कमळा रागाने हातपाय आपटीत निघून जाते. )

हातांतील टाळांच्या नादांत

फाटकी वहान । तुटकी सहान । जावय लहान । इटंबना ।
सावकार थोर । उरावर पोर । लागे घरघर । इटबना ।
दोन भिकारी । कुतऱ्यापरी । गुरगुर करी इटबना ।
वयान थोर । अस्तुरी पोर । जिवाला घोर । इटंबना ।
जिवाला काहिल । हासू होईल । नाव जाईल । इटबना ।
द्रोघिचा दादला काचऱ्यान खचला । बोचऱ्यान गाजला इटबना ।
नासकी होड । सूडाला सूड । वायफळ येड । इटंबना ।
निवडंग वाढलं । नोडग्यानी नाडलं । घर आपल इटबना ।
सावध रहा । भवती पहा । काहूर महा । इटंबना ।

चाल –म्हाळसेसा । नाथ दान दुबळयाचा । बोला येळकूट बोला ।
भवानी । तुळजापूरवासिनी । उदो म्हना उदो म्हना ।
पंढरपूरच्या इटुबाला दान पावल जेजुराच्या खडुबाला दान पावल
शिंगनापूरच्या महादेवाला । किाशच्या इशेशराला दान पावल

(सटवाजी व पिराजी संशयाने त्याच्याकडे पहातात)

**पिराजी** – (सटवाजीस एकीकडे हळू) हा खरा बासुदेव दिसत न्हाय हा हेर हाय जुन (अंबाजीस) ए तू खरा वासुदेव दिसत न्हाईस.

कोन हैस खरं माग न्हाय तर नेनुया तुला चौकीवर हवा?-दाराकड खर मागशील तर मुकाटयान सोडूनबी देईन.

**अंबाजी** – (धीटपणें हवालदाराकडेच का म्हनजी न्या, की तुमच्या धन्याकडं म्या खराच वासुदेव हाय. रोटी तुकडा मागून प्वाट भरतुया. धन्याकड नेल तर बरं व्हईल बमूनशान खाया मिळल अन् पायाचा पायपीट टळल.

**सटवाजी**– ( अळोखे पिळोखे देत ) जाऊ द्या जी नाईक कशापायी ही कटकट रामपहारी. जीव कदुरला या चाकरी पायीं. उगाच पाटापायी पाप कशाला. जार बाबा भाकर तुकडा मिळाला तर पहा कुठ. (अम्बाजी जातो) काय बो म्हना नाईक पण ह्यो म्हणतो तेबा खर हाय. बादशान संभाजी राजामनी मारल्यापून आम्हा मराठ्याची लय इटंबना झालीया बगा. आपुन मराटच होती की.

**पिराजी** – ( सटवाजीच्या तोंडावर हात ठेऊन ) अरं अरं. हत तरी अम कार्ड येड दद्दर कांही बोलू नगस. बर तर बर आपन दोघच होतो हत. खानाच शिपाई असत तर––

**सटवाजी**–तर काय झाले असते ?

**पिराजी** – या बासुदेवाचा मुडदाच पडला असता पन त्या आबाचीबी धडगत नव्हती. आपल्या डोळयादेखत तिची अिटबना झाली असती. ( पडद्यांत ) पकडो, वो जासूस को पकडो. ( एक मुसलमान शिपाई डोळे चोळीत व जांभया देत प्रवेश करतो. पकडो हरामजादे को )

**पिराजी** –या खासाब. हतं कौन हैजो पकडाया ? हामी दोघच होती कोनी आलबी नाय अन गेलबी न्हाय. राती निशापानो तर न्हाय केल ना ? का सपन पडल एखाद राती. आता झोपतून उठला जनू. चलाकी राहुटीत हातपाय असळा अन गुळना करूनशान हुक्का पानी करा. (जातात पडदा पडतो)

प्रवेश पहिला समाप्त



## प्रवेश २ रा

( विशाळगड. ताराबाईचा महाल, सत्वांबेची पूजा चालू आहे. सारजा भजन करीत आहे. राजाराम ताराबाई व चिटणीस बसले आहेत. )

( ताराबाई हळदकुंकू वाहते. राजाराम, चिटणीस नमस्कार करतात नंतर आरती. आरती संपल्यावर निराजन पडते पण विझत नाहीं. )

**ताराबाई**–(भीतीने) अपशकून. अम्बाबाई कां आमच्यावर अशी कोपलीस महाराज बाईंनीं सांगितलेले सर्व कुलधर्म आम्ही आस्थेने करीत आहोत. मग मायमाउली आमच्यावर एवढी रुष्ठ कां म्हणून? मला बाई चिन्ह चांगली दिसत नाहींत. चिटणीस, बाई व बाल-

राजांना गुप्त मार्गाने येथे येता येणार नाहीं कां ? ती दोघच तिकडे एकटी आहेत.

**राजाराम**–परिस्थितीचा विचार करतां आपला सार घराणं यावेळीं एके ठिकाणीं असणं सुरक्षितपणाच नाहीं. ती शक्यता असती तर या पूर्वी आपल्याच बरोबर वहिनी आणि बालराजांनाहि इकडे आणले असते. इथे तरी आपण सुरक्षित आहोत थोडेच ?

**ताराबाई**–मोंगल सैन्य आज महाराष्ट्रांत एवढा धुमाकुळ घालीत असतां संताजी धनाजी स्वस्थ कसें बसले ?

**चिटणीस**–राणीसाहेब, ते स्वस्थ कसे बसतील. खान धूर्त आहे. त्यानें आमची शक्ति विभागण्याकरितां सैन्याच्या निरनिराळ्या तुकड्या करून सर्व महाराष्ट्रात रवाना केल्या. त्यांच्याबरोबर लढाऊ सामानाचा पुरवठा मुबलक आमच्याकडे तीच मोठी उणीव आहे, आमच्याही सैन्याच्या लहान लहान तुकड्या मोंगल सैन्याला जागोजाग गांठून त्यांचे लचके तोडून बेजार करीत आहेत. अवजड सामानामुळे मोंगल सैन्याच्या हालचाली धिम्या असतात आणि त्याचा फायदा आमच्या चपळ तुकड्यांना मिळतो. म्हणूनच आम्ही आतापावेतों तग धरून आहोत. खानाला यमाजीकडून रायगडच्या एकूण एक गुप्तमार्गाची माहिती मिळाल्यामुळे त्यानें प्रत्येक ठिकाणी कडक पहारे ठेविले आहेत. राजाराम महाराज कबिल्यासह प्रतापगडावर आहेत या समजुतीने खानाचे लक्ष सध्या तरी विशाळगडाकडे नाहीं पण लौकरच त्याची चूक लक्षांत येईल आणि या गडाचीहि सुरक्षितता धोक्यात आल्याविना राहणार नाहीं. म्हणून आपलेहि आसन इथे स्थीर नाहीं. संताजी आपल्या निवडक तुकडीसह रायगडच्या आसपास आहेत आणि धनाजी या गडाभोंवती फिरत आहेत असें सारखेने आणलेल्या संदेशावरून समजते.

**ताराबाई**–आणखी काय खबर आहे सारजाबाई ?

**सारजा** – संताजीबाबांनी मला रायगडावर संदेश देऊन पाठविले त्याच वेळीं अम्बाजी व कमळाबाईना शिर्क्यांच्या छावणीत राजकुंवर-बाईंच्या भेटीस पाठविले. ( सैनिक प्रवेश करतो )

**सैनिक** – महाराज अम्बाजी व कमळाबाई आल्या आहेत.

**राजाराम**–जा पाठवून दे त्यांना ( सैनिक जातो. अम्बाजी व कमळाबाई प्रवेश करून दोघेहि मुजरा करतात )

**ताराबाई**–या कमळाबाई बसा. (कमळा बसते.)

**राजाराम**–अम्बाजी काय खबर आहे. थकून आलास बसूनच सांग (अंबाजी मुजरा करून बसतो )

**अंबाजी** – धनी सेनापतींनीं आम्हाला आज्ञा केली त्याप्रमाणें आम्ही शिर्क्यांच्या छावणीत स्वतःचा प्रवेश करून घेऊन दोघेही राजकुंवरबाईंना जाऊन भेटलो त्यांच्या मनाचा कल पाहिला व त्यांना मासाहेब बाळराजांचा आणि आपल्याकडील सारी हकीकत निवेदन केली.

**ताराबाई**–वन्सची तब्यत कशी काय आहे? ती सारी खुशाल आहेत ना ? तुम्हाला तिथं कसं वागवण्यात आलं ? तुम्ही स्वतःचा प्रवेश कसा करून घेतला ?

**राजाराम**–हा किती प्रश्नांचा एकदम वर्षाव. एवढं अधिर होऊन कसं होईल? आपल्या प्रश्नांची उत्तरं एकदम तर मिळणार नाहींतच आज आम्ही एवढया संकटांच्या खाईंत सांपडलो असतांही आपल्या स्वभावांत झालेलें हें आमूलाग्र परिवर्तन पाहून मन समाधानाच्या सुखान भरून येतं. जाऊ व दीरांना पाण्यात पाहणारी आपली दृष्टी निवळली कशी याचं खरोखरच आश्चर्य वाटतं. बरं कमळाबाई, शिर्केराजांची काय खबर आहे.

**कमळा** – मी मुरळी आणि अंबाजी वासुदेव बनून एके दिवशीं सकाळींच खाशांच्या डेऱ्यापावेतों गेलो. कुंवरबाईंचं समोर होत्या. त्यांनीं मला ओळखलं पण बाहेर तसं न भासू देतां अगदीं खास बैठकींन मला नेऊन सारी हकीकत विचारून घेतली. त्यांची प्रकृती तर ठीक आहे पण त्या दुःखातिशयाने अतिशय खंगल्या आहेत.

**अंबाजी** – त्यांनी आपल्यास धीर धरून शांतपणें आल्या प्रसंगाला तोंड देण्यास विनंती केली आहे.

**कमळा** – आणि शिर्केराजांचे मन आपल्या इच्छेनुरुप त्यांनीं पूर्वीच कळविले होते.

**अंबाजी** – स्वतः शिर्केराजांचं ओझरत दर्शन झालं. त्यांच्या मनांवर व शरीरावर प्राप्त परिस्थितीचा मोठाच परिणाम झालेला दिसला.

**कमळा** – मासाहेबांना धीर देण्यास सांगून त्यांच्या व आपल्या केसालाहि धक्का न लागेल अशीं व्यवस्था करण्याची त्यांनीं शपथ घेतली शिर्केराजांना बादशहाने कर्नाटकांत जाण्याचे फर्मान सोडले असून ते तिकडे गेलेही असतील. दुर्दैवाने येऊं नये तो प्रसंग आलाच तर खाशांच्या वेळी झालेली गफलत होणार नाहीं. अशी खबरदारी त्या आतांपासूनच घेत आहेत.

**अंबाजी** – खान जरी मुसलमान असला तरी माणुसकीचा आहे असें आम्हाला आढळून आले.

**ताराबाई**–तें कसें ?

**अंबाजी** - यापूर्वी आम्ही असेंच वेषांतर करून रायगडाच्या पिछाडीहून जात असतां यमाजी खानाला गडाच्या गुप्तमार्गाची माहिती देतांना आढळला. आम्हाला पाहून कमळाबाई कुणीतरी एक सुन्दर स्त्री आहे. अशा कल्पनेनें त्याने कमळाबाईविषयीं खानाची दुष्ट अभिलाषा जागृत करण्याचा प्रयत्न केला पण खांनाने

तिथेंच त्याची निर्भत्सना केली आणि हेतू साध्य झाल्यावर तो यमाजीवर संतापूनच निघून गेला. आम्हाला एकाही वाईट शब्दाने त्याने दुखावले नाहीं.

**ताराबाई**–यमाजीने स्वतःच्या बहिणोला सुद्धां ओळखलं नाही ?

**अंबाजी** – त्यानीं बुरखा घेतला होता.

**राजाराम**–स्वार्थी मनुष्याला स्वतःच्या स्वार्थापुढें कुणाची ओळख रहात नाहीं. तो माणुसकींतून उठलेला एक नरपशूच असतो. अमानुषतेला कोणताहि धर्म बाधक नाहीं. अमानुषता म्हणजेच त्याचा धर्म बनतो.

**कमळा** – राजकुंवरबाईंनी बेगमसाहेबाकड संधान बाधून यदाकदाचित जर भोसले घराण्यांतील कोणी व्यक्ती अगर सारे घराणे मोगलांच्या तांवडींत सापडलेच तर त्यांच्या सर्वस्वाच्या संरक्षणाची हामी बेगमसाहेबाकडून मिळवली आहे. महाराजांच्या वधाचा परिणाम त्यांच्याही मनावर मासाहेबाएवढाच घातूक झाला आणि त्या बापावर संतापून खडकीकडे निघून गेल्या. सध्या त्या खडकीस तळ देऊन आहेत.

**अंबाजी** – आणि झुलफिकारखां हा त्यांचा विश्वासू सरदार व मानलेला भाऊ आहे असेंही ऐकतो. बेगमसाहेबांनीं महाराजाच्या वधाचा सारा ठपका खानावर ठेवला आहे.

**राजाराम**–बादशहाच्या अंतःपुरांत दादाबिषयीं एवढे अनुकूल वातावरण असूनसुद्धां घातूक अनुभव आला,याचें नवल नाहीं का? (सारजा प्रवेश करते. )

**कमळा** – सारजाबाई केव्हां आलांत तुम्ही ?

**सारजा** – ही आताच आले.

**अंबाजी** – कुठून आलांत ?

**सारजा** – रायगडावरून, मासाहेबांना भेटून.

**कमळा** – आतां पुढे काय ठरवलं आहे ?

**सारजा** – महाराजांची आज्ञा होत असेल तर बादशाही गोटांत मी माझ्या धंद्याच्या निमित्तानें जाऊन तेथील भेद काढते.

**राजाराम**–आमची कांहीं हरकत नाहीं पण एकटं जाणं धोक्याच आहे. बरोबर अम्बाजी येतील आणि कमळाबाई राहतील इथे आमच्याजवळ.

**सारजा** – महाराज, अम्बाजींना झील देता आली तर त्यांचाही उपयोग होईल मला. काय हो घाल कां झील ?

**अम्बाजी** –हो, हो ती ही कला हवीच हेराला.

**राजाराम**–आतां अवश्य जा. (अम्बाजी व सारजा जातात)

**ताराबाई**–( उद्विग्नपणें ) आरतीच्यावेळीं निरांजनं पडली हा अपशकूनच नाहीं कां. त्यावेळेपासून नाहीं नाहीं त्या विचारांनीं मनांत काहूर माजवलं आहे नुसतं. मन चिंती ते वैरी न चिंती. आई जगदंबे आतां अंत तरी किती पहाणार आहेस ? ( एक सैनिक प्रवेश करून मुजरा करतो ) कुठून आलास बाबा ? तुझी ही अवस्था आणि चेहरा पाहूनच परिस्थितीची कल्पना होते.

**सैनिक** – जी आईसाहेब, सर्वस्वाचा घात झाला. खानानें गडाला वेढा दिला. तेव्हां संताजीबाबा चपळाईनें धांवून आले व खानाच्या सैन्याला जेर केलं. खानाच्या सैन्याची धूळधाण होऊन त्यानें पळ काढला. बाबा पाठलाग करीत बरेंच दूर गेलेले पाहून खानानें स्वत:च्या निवडक तुकडीसह गडाच्या गुप्त मार्गानें आंत

प्रवेश केला आणि गवतांच्या गंजांना आगी लावून दिल्या. त्या विझवण्यास गडावरील लोक गुंतले आहेत अशी संधी पाहून त्यांच्या गाफिलपणाचा फायदा घेतला. निकराचा हल्ला करून सर्वांना कैद केलं. नंतर दाभाडे, मासाहेब व बालराजे यांना गिरफतार करून तांतडीनें सर्वांना घेऊन तो खडकीच्या मार्गाने लांबलांबच्या मजला मारीत निघाला.

**राजाराम**–त्याचा पाठलाग होत आहे कीं नाहीं ?

**सैनिक** – जी धनी संताजी बाबाना हा खानाचा कावा कळतांच ते तरत गडाकडे येतात तो खान एक मजल ओलांडून गेला होता.

**ताराबाई**–(दुःखानें) आई अम्बाबाईनें कौल दिलाच होता. बाई व बालराजे यांची काय अवस्था असेल याची कल्पनामुद्धां भीतीनें बेचैन करते.

**सैनिक** – आईसाहेब, मासाहेब, बालराजे व दाभाडे यांना खान मोठ्या-मानमरातबानें वागवीत आहे. त्यांना गिरफतार केल्यानतर एकाहि शब्दानें दुखवले नाहीं. मात्र सूर्याजीला कडक बदोबस्त त जंजीरबंद करून त्याची करता येईल तेवढी निर्भत्सना करीत त्याला खाशांच्या बरोबर पायी रखडीत नेले आहे. मासाहेबांच्या प्राणाला व व्यक्तित्वाला कमीपणा न येईल अशी त्याने कुराणे शरीफची कसम खाऊन हमी भरली आणि मासाहेबांना भीरासा दिला आहे. सताजी बावा लाब लाब मजला मारून पल्ला काटीत खानाचा पाठलाग करीत आहेत. खान बालाघाटाच्या रोखानें बीड शहागडाकडे धांवपळीने पल्ला काटीत आहे. तेथूनच सेवेत हाजर झालो आहे आतां विशाळ गडही धोक्यात आहे. तरी आपण सर्व कबिल्यासह गड सोडावा असें त्यांनी तेवढ्यांत संधी माधून आपल्याला संदेश दिला आहे.

**राजाराम**–धनाजीची कांहीं खबर आहे कां ?

**धनाजी**–(घाईघाईने प्रवेश करून मुजरा करतो.) महाराज स्वतःच सेवेंत हजर झालो असून चरणाशीं विनती आहे.

**राजाराम**–ती कोणती ?

**धनाजी** – म्हणून या दोन गडाभोंवतीच्याच जंगलांत कांहींकाळ अज्ञातवासांत काढावीत. चिटणीस, महाराजांच्या मदतीला आपण त्यांच्याबरोबर असावे. पिंगळे व सक्राजीपंत संताजीबाबाच्या मदतीला निवडक स्वारानिशी धावपळीने गेले आहेत. खानाने आम्हाला चकवले. आम्हीहि खानाला चकविण्याचा निश्चय केला आहे. मराठ्याचे बहुतेक सारे सैन्य आपल्या पाठलागावर आहे अशी खानाची व बादशहाची समजूत करून देऊन बादशहाच्या सैन्यांत ख्यालीखुशाली वाढविण्याकरतां सारजाबाईना तिकडे पाठविले आहे.

**चिटणीस**–त्या आजच येथून अम्बाजीला घेऊन गेली आहे.

**धनाजी** – बादशहाचे सैन्य असे ख्यालीखुशालीत गाफिल गांठून आम्ही आमच्या निवडक तुकड्यासह भिल्ल कोळ्यांच्या मदतीने बादशहाच्या छावणीवर हल्ला करण्याचा विचार करीत आहोत.

**चिटणीस**–आपला मानस आम्हाला योग्य वाटतो. बादशहाच्या छावणीवर हल्ला झालेला ऐकून खान बादशहाच्या मदतीला धांवून येईल. शिर्केराजे कर्नाटकांत निघून गेल्यामुळे बादशहा सध्या एकाकी आहे. खान मधूनच परतला तर मासाहेबांची सुटकाही होईल आणि संताजीबाबा, पंत व पिंगळें मिळून खानाच्या सैन्याचे लचके तोडून खानाला सळोकीपळो करून सोडतील.

**धनाजी** - चिटणीस, आपली कल्पना शक्य कोटींतली असली तरी संभवनीय वाटत नाहीं पण आम्ही बादशहाच्या छावणीची धुळधाण करून बादशहाला येथून हाकलून लावूं आणि लौकरच आपल्याला आपल्या अज्ञातस्थळीं गांठू. तोपावेतों संताजीबाबा, पंत व पिंगळे परत येऊन भेटतील. त्यानंतर पुढच्या व्यवस्थेचा विचार करणें आवश्यक आहे. आतां विलंब नको. खाशांनी उदईक प्रात:काळी गड सोडावा. आम्हालाही आज्ञा असावी.

प्रवेश दुसरा समाप्त



## प्रवेश ३ रा

(औरंगजेबाची छावणी. सैनिक विजयोत्सवांत गुंग आहेत.)

**शेख्खा** - मनावो खूब खुशी के जलसे मनावो. शहेनशाका फर्मान है. जहांपन्हा आलंगीर बन गये. ये शान व षौकत, ये इज्जत व व आब्रू अभी तक किसी भी इसलामी बादशहा को नशीब नहीं हुई. जहांपन्हा आजसे शहेनशहा आलंगीर बन चुके. हमारे इस्लामका उरूज अखरत को जा पहुंचा. हमे मूकम्मिल फता हासिल हुई. दख्खन के शेर मे मुकाबिले करके हमने आखेर फता पायी.

**बहादरखां**-आमेन ! यार, कुछभी कहो मेरे खियालसे हमने मुकम्मिल फता नहीं पायी.

**शेरखा** – ये क्या नादानी की बातें हैं ? सारे हिंदुस्थानमें आज मुगलिया सलतनत महेक रही है तोभी तुम्हे शक व शुभा हैं ?

**बहादरखां**-नही तो क्या. हमारा खियाल था के मराठो का संभाजी राजा खतम होनेके बाद बकोया सरदार पस्त हिम्मत होकर हमारी हुकूमत को मान लेंगे, मगर तजरूबा तो हमारे खियाल के बिलकुल बर खिलाफ आरहा है. संभाजी को कत्तल करना गोया एक आफत मोल लेने की नौबत है. मरेठे पस्त हिम्मत होने के बजाय उनकी हिम्मत दुगनी हुई

**शेरखा** – वाकिया तो सही है. संभाजी राजा के हयातो में जो सरदार उनको हिकारत के नजरसे देखकर हमारी इमदादके रवां थे वो सारे आज बदल गये और मरेठोंकी सलतनको फिरसे कायम करनेके लिये जानवमाल से एकठ्ठे हो रहे हैं. ये तो सही है के उनको हमारा मुकाबला करनेकी हिम्मत नहीं है ताह हमे गाफिल पाकर वो एक ब एक हमला करते हैं. हमारे कयीं जवानों को गारद करते है लुट करते हैं और इतनी फूर्तिसे हमारे जानवमाल को जरर पोहोंचाते है जिससे हमकोही पस्त हिम्मत होनेका वख्त आता है. बेटे शैतान से एक ब एक कहां से आते है और कहां गायब होते हैं इसका पता भी नहीं चलता.

**बहादरखां**-मालूम होता है के मरेठों के सिपासालार कोई संताजी और धनाजी है. मगर तआजुब तो ये है के उनकी न छावनी है न शामियाना उनका लष्कर कहां रहता है, वो कहां रहते हैं. कहां खाई पकाई करते है और कहां आराम करते हैं व कब आराम

करते हैं जिस वख्त देखो उनके टट्टू रिकीब बदही होते है उनका न तोफखाना है न हाती उंट हमारे काबुली घोडोंके मुकाबिले उनके टट्टू खिलोने से दिखाई देते है

**शेरखा** – जाने दो यार. इस खुषीके वख्त ये वहिशितनाक बातोंसे बेजारी आती है. ( दारूचा प्याला पुढे करून ) लो इस प्यारी की भी जरा लज्जत लो. मेरी प्यारी शराब। मेरी जानी शराब। आज तुझे डालु पेट में। ( पिण्यास प्रारंभ करतो )

**बहादरखां**-(पीत पीत शेरखांस डवचून ) आरे यार ये शराब के साथ शराबी आखे अगर नहीं तो इसकी लज्जतरूखी मालुम होती और बेचैन भी करती है.

**शेरखा** – अरे यार वो देख क्या खुदाकी शान है. शराबी आंखे भी नजर आरही है. और उसके साथ उसके साजिंदेभी है.

( सारजा अम्बाजीसह प्रवेश करतो. )

**सारजा** – (एकीकडे) या मेल्यांना इथं असं रंगढंगांत गुंगवून शराबीच्या नशेंत बेहोष करुंया. पण तुम्ही मात्र जरा पित्ताला दाबून असा. आमचं कसब कसं असतं ते मुकाट्यानं पहा. (उघड) बंदगी खा साब

**अंबाजी** – (सारजेस एकीकडे हळूच) हं घाला नंगा नाच पण काम फत्ते करा. आम्ही काय, दिल्या बुद्धीचे अन् सांगितल्या चाकरीचे. बोलून चालून ढव्वे.

**बहादरखां**-वाहवा, मगर ये कौन है साथ ?

**सारजा** – या बसा, महा वस्ताद हैती की ते.

**शेरखा** – ए प्यारी तुम कहां से आई और तुम्हारा नाम क्या है ?

**सारजा** – बिसरला जून खा–साब. गुलशनजान तरी याद हैतकी नाय ?

**बहादरखां**-किसकी जान और किसकी पहिछान रखेंगे? ऐसे क्यो गुलशन आती है और जाती है. हम सिपाई लोग अगर ये आने जानेवालें गुलशनोंकी जान पहछान रखेंगे तो हमारा जनाना एक जहानुम-खाना हो जायगा

**सारजा** – (लटका राग दाखवून) मंग जिथ पिरमाची पहिछान नहीं तिथं येन्यातबी जान नहीं. (अम्बाजीस) चला वस्तादजी. आज या छावनींत जलसे कामियाबी लय जागीं है, आज सुपारी. याकूबखानाकडं जाऊं. त्यानं उगुदर सुपारी दिली अन् म्या पिरमाखातर ती डावलली पन याना मानसाची कदर है तरी कुठं? जा तुम्हा पुढं होऊन खानाला मी हमरी द्याया येन्याम निघाले म्हून जाऊन सागा. ( अम्बाजीस खुणावने. अम्बाजी जातो ) बरं खासाब, सलाम. (चालू लागते)

**शेरखा** – बस तुम तो सिरफ नामकेही बहादरखां हो. तुम्हारी बहादुरी ओरतों के ही साथ. मैदानपर संताजीका नाम सुनते ही मौत आती है. तुम नही जानते इन्हे तो न जानो हम पहिचानते है. ये तो सरजेखाकी सरजा जान. आवो जान, हम तुम्हारी माफी चाहते है (लाळ घोटीत) मेरी जान लावो और एक प्याला और एक पटी. क्योजो बहादरखा, तुम्हारा क्या इरषाद है ?

**बहादरखां**-हां भाई. बात तो सही है. मगर अभीतक आंखों में नशा नही उतरी. कंगनों के हातो से भरा हुवा शराब का प्याला ही शराबी आंखें पहिचानता है. लाव नाजनी एकही नही दो प्याले. (सारजा दोघांना दोन प्याले देते. नंतर विडे देते. ) ( स्वगत-मेल्यांना विड्यांतून द्यावं धोत्र्याच बी म्हणजे वेड्यासारखे छावणीभर आरडा ओरडा करतील आणि यांच्याभोंवती होईल गोंधळ अम्बाजी चिलमेचा प्रसाद देऊन तिकडेहि माजवील गोंधळ.)

**शेरखा** – नाजनी अब एक चीज, वो बालेघाटी क्या चीज होती है, वो ही होने दो.

**सारजा** – (लाजत मुरकत गालांतल्या गालांत हांसत भेदक दृष्टीनें पहात ) म्या कवां तयार नाय म्हनल जी. पांच म्हौरा बिदागी फेका. मो हैच हत म्हौरं.

**बहादरखां**-आय जान मार डाला. पांच ही क्यों पचीस लो. तुम्हारे परने जान कुरबान है (झिंगू लागतो) गावो मेरी प्यारी. गावो.

**सारजा** – (गाते व नाचते).

सखया माझे एक हृदय ते गेले चोरी । काय करूं ।
नाहीं दुसरे। आणूं कुठले, सांगु कुणा मी काय करू ।
चोरी मागे करूनी नेले, माझे सारे मारथी तूं ।
कां उगाच आतां शिणविशी काया, जाऊ कुठे मी काय करूं
दासी तुझी रे तिष्ठतसे ही प्रेमक्षता बहु अनुरक्ता ।
किती विनवू रे सखया आतां जाऊ कुठे मी काय करूं ।

लावणी

(चाल–कंगणिदार भरजरी)

दिलदार दिलारा भरज्वानीचा बहरो बहादर ।
पाहुनी तुजला नवति नारही झाली बेजार ।
तुझ्यावीण मी सख्या साजणा किती राहूं दूर ।
छेडुनि मजला तरणिताठीला बाग हिरवोगार ।
नको राजसा जाऊ सोडुनि आंगतिल नार ।
जासी आतां कुठे ज्वानीचा करूनी कुस्कर ।

(पड्यात गोधळ मारो, काटो, पकडो. शाही शामियाना लूटा गया. अल्लाहु अकबर, हर हर महादेव. मरेठोका बैतान धनाजी, होषियार, भागो दौडो. शेरखा व बहादरखां भीतीनें गर्भगळीत होतात. चक्कर येऊन पडतात )

दोघे एकदम-या अल्ला मर गये. (बेशुद्ध होतात) (अम्बाजी प्रवेश करतो)

**अंबाजी** – चल सारजे काम फत्ते. दुष्मन पळन सुटला मराठ्यांनी शाही छावणी लुटून उध्वस्त केली. बादशहा नमाज पडत होता म्हणून जिवानिशी निमटला. एका सभाजीच्या हत्येमुळे हजारो हराम मौतान मेले

प्रवेश तिसरा समाप्त



## प्रवेश ४ था

(प्रतापगडाचे पिछाडीचे जंगल. अंबाजी व सारजा प्रवेश करतात)

**अंबाजी** – सारजाबाई, त्या दिवशीं तुम्ही खरोखरच मोठी बहार केलीत. नित्याच्या संवयीमुळें नुसत्या दारूमुळेंच ते शिपाई स्वतःला विसरण्याइतके बेहोष झाले नसते. तुम्ही दारूंत आणखी एखादी कांहींतरी जालीम वल्ली मिसळली असावी होय ना ? पण त्या-मुळे काम मात्र बेमालूम साधलं. वास्तविक बीनीच्या चौकी-दारावरच छावणीच्या संरक्षणाची मोठी जिम्मेदारी असते. त्या आघाडीच्या मोर्च्यावरच तुमच्या मोहिनी व मदिरेनें कल्पनेबाहेर कामगिरी केली, म्हणून धनाजी काकांना बिनबोभाट बाद-शहाच्या दलबादल शामियान्यापावेतों जातां आले.

**सारजा** – माझी मोहिनी किंवा दारूची निशा या पेक्षां त्यांना स्वतःच्या विजयोन्मादाची निशा बेहोष होईपावेतो चढलेली होती. दारूच्या निशेनें फारतर दहापांच शिपाई बेहोष करतां आले असते. पण त्या दिवशीं सारीच छावणी बेबस झाली होती. पण कांही त्या दिवशीं बादशहा आयता नमाझ पढण्यांत गुंतलेला असतां धनाजी काकांना सांपडला पण त्यांनीं त्याला गिरफतार न करतां शामि-यान्याचे सोन्याचे कळस लुटूनच त्याला सोडून दिले ही त्यांनी हलगर्जीपणाच कमालच केली असें वाटत नाहीं कां ?

**अंबाजी** – उपासनेंत गुंतलेल्या भक्ताच्या एकांततेचा भंग कुणी कधी करू नये कधीकुणाचे कल्याण होणार नाहीं.

**सारजा** – आमचे खाशे संगमेश्वरी असेच भवानीच्या उपासनेंत तल्लीन असतां झुलफिकारखानानें त्यांना गिरफतार केले नाहीं कां ? आम्हीच नियम धर्मांची बंधनं पाळावींत हें नवलच नाहीं कां ?

**अंबाजी** – एकानें एक चूक केली तीच दुसऱ्यानें समजून उमजून करावी असें का तुमचे मत आहे ? बादशहाला सोडून देण्यानें आपल्या यशाला आज जे मोल मिळालं ते त्या वेळी मिळाल नसतं. शत्रूवर मात करण्याच्या अनेक प्रकारांपैकी तोही एक मोठा प्रभावी प्रकार आहे त्यामुळें बादशहा नुसता खजीलच झाला नाही तर त्याला भावी संकटपरंपरेची कल्पना येऊन त्यानें दहशत खाल्ली आणि येथून त्यानें कायमचा पळ काढला तो आतां पुन्हा स्वतः इकडे येणार नाहीं अशी खात्री आहे

**कमळा** – (एकदम प्रवेश करते) कोण अम्बाजी, वाहवा तुम्हीही इथेंच भेटलांत, महाराज कुठे आहेत ?

**अंबाजी** – सध्यां ते विशाळगडावर आहेत. कांहीं विशेष खबरबात? आतां कुठून आलांत ?

**कमळा** – ते सारं समजेल लौकरच. थोडा धीर धरा बरं इकडची काय खबर आहे ?

**सारजा** – बालराजे व मासाहेब यांची खबर समजल्याशिवाय आम्हीही आमचेकडची कांहीच खबर कळवणार नाहीं. होय] ना हो अम्बाजीराव ?

**अंबाजी** – तेही खरंच. मासाहेब कोठे आहेत. संताजी बावा, खानाचा पाठलाग करीत होते त्यांची काय खबर ?

**कमळा** – मासाहेब बालराजासह बेगमसाहेबांच्या आश्रयांत खुशाल आहेत. बेगमसाहेब मासाहेबांचा वडील बहिणीच्या मानमरातबाने सांभाळ करीत आहेत व बालराजांचा तर त्यांचा एवढा लळा लागला आहे कीं त्यांना क्षणभरसुद्धां सोडून त्या राहात नाहींत संताजीबाबांनी खानाचा पाठलाग खडकीपावेतों केला खरा पण त्यांना

खानाला मध्यें गांठता आले नाही. खडकीला शाही बंदोबस्त करडा आहे, तेथें स्वतःचा निभाव लागणार नाहीं व खाशेही सुरक्षित मानमरातबाने वागवले जातात अशी खात्री झाल्यावरच त्यांनी पाठलाग करणें सोडून दिलें. शिवाय बादशहा स्वतः तुळापूरचा तळ सोडून खडकीकड कूच करीत असल्याची खबर समजली. महाराष्ट्रांत शाही सैन्याचे आतांपावेतों काबीज केलेला प्रांत परत काबिज करण्यास ही संधी नामी आहे असे वाटून तें परत इकडेच येत आहेत पण चला आपण गडावर जावू या. इथें जंगलांत ही चर्चा करणं सुरक्षित नाहीं. मला महाराजाची शक्यतों लौकर भेट घेऊन मासाहेबांचा संदेश त्यांना पोहोचवावयाचा आहे. ( धनाजी प्रवेश करतो )

**धनाजी** – कोण अम्बाजी, अद्यापही तुम्ही इथेच तळावरील सारं सामान गडावर पोहोंचतसुद्धां झाल आणि कमळाबाई केव्हां आल्या ?

**कमळा** – ही आतांच आले.

**धनाजी** – बरं आतां इथें थांबू नका, लौकर गडावर जा संताजीबाबासुद्धां आले आहेत त्यांची आमची भेट झाली त्यांनाही गडावरच पाठवले आहे. तळावरील सारा आवरामांवर करून आम्हीही तुमच्या मागोमाग येतोच ( जातात. पडदा वर जातो मागे गडावरील दिवाणखाना, राजाराम महाराज, ताराबाई, संताजी व चिटणीस बसले आहेत. अम्बाजी, सारजा व कमळा प्रवेश करतात व मुजरा करतात. राजाराम त्यांना बसावयास सांगतात व आज्ञेनुसार ते बसतात )

**संताजी** – कमळाबाई, तुम्ही कधीं आलांत? तुम्ही मासाहेबांच्या आज्ञेनुसार खडकी सोडली ही खबर आम्हाला समजल्यापासून आम्ही सारखा तुमचाच शोध करीत होतो.

**कमळा** – मला इकडे पाठवण्यास बेगमसाहेबांची सुद्धां संमती असावी असें दिसतें. कारण एका संरक्षक तुकडीने खडकीच्या हद्दीबाहेर आणून पोहोंचवले. तेथून मी मजल दर मजल वेषांतर करून आले. येतां येतां गडाच्या पिछाडीस सारजाबाई व अम्बाजी भेटले आणि धनाजीकाकाही भेटले. त्यांनीच आपण सारी यथ आहांत असें सांगून आम्हाला इकडे पाठवले व तेही तळावरील निरवानिरव करून येत आहेत.

**ताराबाई**–बाई व बालराजे तर सुरक्षित आहेत ना ? त्यांची प्रकृती कशी आहे ? तिथे त्यांना कांहीं त्रास तर नाही ना ?

**राजाराम**–दाभाडे व सूर्याजी कुठे आहेत ?

**कमळा** – दाभाडे मासाहेबांच्याच तैनातींत आहेत. मासाहेब व बालराजे यांना बेगमसाहेब स्वतःच्या बरोबरीने वागवतात. त्यांचा सारा वेळ मासाहेबाबरोबर बालराजांशी खेळीमेळीत जातो. दाभाड्यांच्या सल्ल्यानें मासाहेबांनीं आपल्याला हा निरोप दिला आहे स्वतः दाभाडेच येणार होते. बेगमसाहेबांनी बादशहाकडून तशी परवानगीह घेतली होती पण मासाहेबांच्या आग्रहावरून ते तेथेच राहिले कांहीं दिवस तरी मासाहेबांना सोडून येणार नाहींत. घरधन्याची सुटका होणें शक्य दिसत नाहीं त्यांना राजद्रोहाच्या पापाचं योग्य बक्षिस मिळालं. माझा संसार संपला या पुढें मला माझं सारं आयुष्य स्वामीसेवेंत घालवावयाचें आहे. मासाहेबांनीं माझ्यावर सोंपवलेली येथील कामगिरी संपवून महाराजांचा संदेश मासाहेबांना पोहोंचवण्याकरितां तिकडे गेल्यावर मी स्वदेशांत मासाहेबांबरोबरच परत येईन. बादशहाने झुलफिकारखानाची दक्षिणेचा सुभेदार म्हणून नेमणूक केली आहे व लौकरच पुन्हां त्याची इकडे रवानगी करण्याचा त्याचा

विचार आहे दाभाडे व मासाहेबांच्या मते आतां आपण महाराष्ट्र काहीं दिवसांकरितां तरी सोडावा. रायगडावरील कुलस्वामीनीचे अर्चनादि नित्य नैमित्तिक पूर्ववत कायम ठेवण्यास बेगमसाहेबांनी खानास आज्ञा दिली आहे महाराज हा पहा मासाहेबांचा संदेश. ( थैली राजारामास देतो तो घेऊन तिला वंदन करून )

**राजाराम**–चिटणीस, मासाहेबांची काय आज्ञा आहे वाचा पाहूं ?

**चिटणीस**– ( थैली खोलून त्यांतील पत्र वाचतो ) चिरंजीव भावजीस अनकोत्तम आशिर्वाद. आम्ही बालराजासह बेगमसाहेबांच्या आश्रयांत सुरक्षित आहोंत, आमच्या सुटकेची आशा आतां जवळ जवळ नष्टच झाली असली तरी आमच्या व्यक्तित्वाला व जीवाला धोका नाहीं ही आमची खात्री आहे म्हणून आमची काळजी करण्याचे कारण नाहीं. आतां आपणच मराठा साम्राज्याचे छत्रपती. त्या पदाचा स्वीकार करून राजसूत्रे हाती घ्यावीत. राज्याभिषेक करवून घ्यावा. आमचा आपल्याला आशिर्वाद आहे स्वतंत्र साम्राज्याचे सिंहासन मोकळे ठेवून अराजकता वाढवूं नये. सिंहासनावर राजा नसतांना आपण देत असलेला लढा बंडाच्या स्वरूपाचा ठरेल. तोच लढा अभिषिक्त राजा या नात्याने दिला तर दोन स्वतंत्र साम्राज्यातील स्वातंत्र्य सरक्षणाच्या संघर्षाचे त्याला स्वरुप येईल. खाशांची शेवटची आज्ञा डावलू नका. बादशहाच्या आज्ञेनुसार झुलफिकरखां आपला पाठलाग करण्याकरितां लौकरच निघणार आहे. त्यापूर्वी आपण आपल्या कबिल्यासह महाराष्ट्राबाहेर निघून जावे. खानाला आपला सुगावा लागू देऊं नये. शिर्केराजे पश्चात्तापानें पोळले आहेत ते आतां तुम्हाला विरोध करणार नाहींत. मदतच करतील तसा त्यांनीं आम्हाला गुप्त संदेश पाठवला आहे..

स्वत: वन्स आम्हाला येऊन भेटून गेल्या. शिर्के सध्या कर्नाटकांत जंजिऱ्याच्या जवळपास आहेत. तिकडेच आपण गेला तर धोका बाळगण्याचें कारण उरणार नाहीं. संताजी, धनाजी वगैरे महाराष्ट्राचे संरक्षण करतील. आई अम्बाबाई आपले पाठिशीं संरक्षण करण्यास उभी आहे जय जय रघुवीर समर्थ.

**संताजी** – मांसाहेबांची आज्ञा आम्हाला योग्य वाटते. बालराजांच्या सुटकेची आशा नष्ट झाल्यावर त्यांचे नांवे व्हाही फिरवून त्यांच्यामार्फत आपण राजसूत्रे हलवावीत ही आपली कल्पना आतां आम्हाला योग्य वाटत नाहीं. कारण ज्यांना आपण राजे मानतां ते बंदिवान झालवर त्ययांचे स्वातंत्र्य नष्ट होते आणि भावी लढ्याला लढाईच्या स्वरूपाऐवजीं बंडाचें स्वरुप येईल.

**चिटणीस**–या सर्व परिस्थिताचा विचार करतां आपण मासाहेबांच्या आज्ञेनुसार व खाशांची शेवटची इच्छा म्हणून तरी राज्याभिषेक करवून घ्यावा. यामुळें आपण बालराजांच्या अधिकारावर आक्रमण करीत आहांत अशी आपली झालेली भावना या वेळीं आपण बाळगू नये. स्वराज्याच्या स्वातंत्र्याकरतां म्हणून तरी आपल्याला आपला अट्टाहास सोडावयास हवा आणि आम्हा सर्वांची आपल्याला विनंती आहे. (धनाजी प्रवेश करतो)

**धनाजी** – महाराज या वेळी तरी आम्ही आपला हेका चालूं देणार नाहीं. प्रसंगानुसार थोडी अमर्यादा झाली याची क्षमा करा.

**राजाराम**–आपल्या सर्वांच्या इच्छेबाहेर आम्हाला जाता येणार नाहीं. पण आज ही स्वराज्याची विस्कळीत घडी सांवरणें अत्यंत कठीण कार्य झाले आहे. सैन्यबळ नाहीं. आर्थिकबळ नाहीं आणि साधनसामुग्रीही नाहीं. ही आज स्वराज्याची व्यवस्था आहे. या अडचणींतून बाहेर पडण्यास मार्गही सुचत नाहीं. आम्ही ाबांवून गेलो आहोत.

**ताराबाई**–पण जंजीरा किल्लासुद्धां आज आपल्या ताब्यांत नाहीं. आतां-पावेतों आम्ही आमच्या हिश्शाकरतां धडपडत होतो. मत्सर केला पण दुर्दैवानें हिश्याऐवजीं सारेच साम्राज्य सांभाळी आले असतां मात्र मनाची कुचंबणा झाली, आल्या प्रसंगाला तोंड देणें भाग आहे म्हणूनच आज आम्हाला साम्राज्याच्या छत्रपती-पदाची जोखीम शिरावर घेण्याची पाळी आली. महाराज या कमळाबाई व सारजा प्रवासाच्या त्रासाने थकल्यामारख्या दिसतात, त्यांना विश्रांतीची आवश्यकता आहे म्हणून त्यांना घेऊन आम्ही अंतःपुरात जातो.

**चिटणीस**–जंजीऱ्या किल्ल्याची काळजी नको. तेथील किल्लेदार आपलेच आहेत. प्रसंगानुसार ते सध्या परकीय सत्तेचे चाकर आहेत. आम्ही त्यांचे मन वळवून त्यांना आपलेसे करतो त्याच प्रमाणें दाभोळचे वंशपरंपरागत वतन शिर्क्यांचं होते ते जर त्यांना परत केले तर ते उघड उघड आपल्याला येऊन मिळतील. शिर्काणा-नंतर ते वतन आम्हाला देण्यांत आले ते आम्ही परत करण्यास आनंदाने तयार आहोत. ज्या गोष्टीने स्वराज्य वृद्धि होईल तो त्याग करण्यास आम्ही सदैव तयार आहोत तेंच आमचे ध्येय आहे. आणखीही एक सूचना आम्ही पुढें मांडणार आहोत, ती हीकीं स्वाभिमानी तरुण होतकरूंची मनें वळवून त्यांच्या कर्तबगारीला वाव देण्याकरितां त्यांना वतने जाहागिरी वगैरे देऊन कार्यतत्पर करावे. दिलेली वतने जहागिरींचा कबजा घेण्याकरिता ते झटतील आणि अनायासेच स्वराजाचा विस्तार वाढेल. चौथ व सरदेशमुखीच्या उत्पन्नाने आर्थिक अडचणही होईल आणि माणूसबळही वाढेल.

**राजाराम**–आई अम्बाबाईंची कृपा. असलें त्यागी कर्ते जर स्वराज्याला लागले तर झालेली हानी तर भरून निघेलच पण स्वराज्याची

वाढ कल्पनेबाहेर होईल आणि त्याची प्रभा अखिल भारताचे डोळे दिपवील. चिटणीस, उदईक आपण कबिल्यासह प्रतापगडावर जाऊंया. कबिला सक्राजीपंताच्या स्वाधीन करून आपण वेषांतर करून जंजीकडे कूच करूं या. तेथें पोहोंचल्यावर आम्ही राज्याभिषेक करून घेऊं. तोपावेतों स्वराज्याचा कारभार पुढेंही पाहूं. संताजी नि धनाजी महाराष्ट्रात राहून कोटकिल्ल्यांचे संरक्षण करावे. सक्राजीपंत व पिंगळे ही त्यांच्या मदतीला इकडे आहेतच. कांही दिवसांनंतर दाभाडेही परत येतील व इकडेच आपल्या मदतीला राहतील. चला उठा, राष्ट्रजननी जगन्मातेचे पुण्यस्मरण करून परकीय सत्तेची धुरा झुगारून देण्याची प्रतिज्ञा करून पुढील कार्याचे प्रस्थान ठेऊं या.

( पडदा वर जातो. भवानीचें मंदीर देवीसमोर ताराबाई, कमळा, सारजा प्रार्थना करीत असता राजाराम, चिटणीस, अंबाजी, संताजी व धनाजी प्रवेश करतात. देवीस नमस्कार करतात. )

**राजाराम**–अम्बाजी ! राणीसाहेबांसह सारजा आणि कमळाबाईना गुप्तमार्गानें विशाळगडावर सक्राजीपंताकडे पोहोंचव. दाभाडे व घोरपडे महाराष्ट्रांतील आपला प्रदेश गनीमो लढा देऊन परत मिळवतील.

**कमळा** – महाराज, मी मासाहेबांच्या सेवेची शपथ घेतली आहे. मी तिकडे जाणार मला आज्ञा असावी.

**चिटणीस**–आणखी एक विनंती आहे महाराज.

**ताराबाई**–ती कोणती ?

**चिटणीस**–या मगलप्रसगीं निराशेमुळें कमळाबाई कष्टी आहेत व संसाराला विटल्या आहेत. मासाहेबाच्या मदतीनें बेगमसाहेबांकडे रदबदली करून त्यांच्यामार्फत बादशहाचे मन वळवून सूर्याजी पिसाळांची

सुटका करावी राजद्रोहाच्या अघोर कर्माचा त्यांना पश्चात्ताप झाला आहे ते यापुढे राष्ट्रसेवातत्पर होतील आमची तशी खात्री आहे.

**ताराबाई**–आणि ते स्वदेशी परत आल्यावर त्यांना बाईची सरदेशमुखी सनद द्यावी ते स्वराज्याच्या वतीने ती मिळवून स्वतःचा अम्मल वसवतील

**राजाराम**–चिटणीस आपला सल्ला आणि राणीसाहेबांची इच्छा आम्हाला मान्य आहे. अम्बाजी विशाळगडावरून मासाहेबाकडे जाईल. त्याना आमच्यामार्फत सूर्याजीच्या सोडवणुकीची खटपट करण्यास विनता करा कमळाबाई, आता तुम्ही परत मासाहेबाकडे जाण्याचा विचार सोडा. इथेच देशसेवेस पुष्कळच वाव आहे.

**कमळा** – आज्ञा महाराज.

**राजाराम**–आता विलंब नको. आई अम्बाबाई पुढे प्रस्थान ठेऊन उद्या कूच करुं या. ( ताराबाई देवीपुढें प्रस्थान ठेवते. सर्वजण देवीस नमस्कार करतात. )

भैरवी

भवानी राष्ट्र जननि स्मरूनि । मावळ मोळा सारा मिळुनि ।ध्रु।
त्यजुनी द्वेषा द्वैता भावा । संघटणेने करू तत्सेवा ।।
परसत्तेची धुरा वारुया । उजळया स्वतंत्र दीप भुवनी ।।१।।

'' सहना ववनु सहनौ भुनक्तु ' सहवीर्य करवावहै ।
तेजस्विनावधीतमस्तु मां विद्विषावहै ।.
ॐ शांतिः शांतिः शांतिः

**समाप्त**